# उद्यांचा महाराष्ट्र

[ पुरुषपात्रविरहित एकांकी संगीत नाटिका. ]

: लेखक :

ना. द. मराठे

रामकृष्ण बुक डेपो : गिरगांव : मुंबई, ४

## पात्रांची ओळख

**सरलाबाई** : वैद्यकीचा शिक्षणक्रम पुरा झालेली एक सुशिक्षित स्त्री.

**सुमन** : सरलाबाईची धाकटी बहीण.

**उर्मिलाबाई** : रावबहादुर आप्पासाहेब उंचवटे यांच्या पत्नी.

**उषा** : उर्मिलाबाईची मोठी मुलगी (पुणे येथें कॉलेजांत शिकत असते.)

**लता** : उषेची धाकटी बहीण.

**गंगू** : उर्मिलाबाईची मोलकरीण. पांढरपेशा वळणाची व मध्यम वयाची. लिहितां वाचतां येणारी.

**शांताबाई** : अण्णासाहेब धडफळे वकील यांची पत्नी. सुशिक्षित व सुधारणाप्रिय.

**कुसूम** : शांताबाईची मुलगी.

एकादा उत्सव, समारंभ, संमेलन अशा प्रसंगीं हायस्कूलमधल्या वरच्या यत्तेंतील मुलींना करतां येण्याजोगी ही पुरुषपात्रविरहित अशी एकांकी नाटिका आहे.

या नाटिकेंतील कथानक नेहमीं व्यवहारांत दिसून येणाऱ्या कांहीं व्यक्ति व प्रसंग यांवर उभारलेलें आहे. गरिबीविरुद्ध श्रीमंती हा या नाटिकेंतील समर-प्रसंग आहे. या समर-प्रसंगांतील निरगांठ चवथ्या प्रवेशांत मारली असून शेवटच्या म्हणजे पांचव्या प्रवेशांत तिचा उकल केला आहे. ही गोष्ट वाचक-प्रेक्षकांच्या लक्षांत येईलच. चार मंडळी गप्पागोष्टी मारायला बसली म्हणजे ती एकाच विषयावर सुसंबद्ध रीतीनें कधींच बोलत नाहींत. त्यांच्या बोलण्यामध्यें अनेक विषयांतरें व फांटे फुटलेले असतात. असें कांहींतरी या संवादांतून झालें असल्यास तें स्वाभाविकच आहे. तरीसुद्धां संवादांतील भाषणांचा नि विषयांचा ओघ या कथानकांतील मूळ सूत्राकडे वारंवार खेंचण्याचा प्रयत्न केलेला वाचकांस दिसून येईल.

या नाटिकेंतील सर्व पात्रें नि प्रसंग निव्वळ काल्पनिक आहेत. तरीसुद्धां समाजांत नित्य आढळून येणाऱ्या कांहीं व्यक्तींची व प्रसंगांचीं प्रतीकें या नाटिकेंत उमटलेलीं आढळून येतात. नाटक हें संसाराचें एक चित्र असल्यामुळें असें होणें अपरिहार्य आहे.

'रामकृष्ण बुक डेपो'चे चालक श्री. **वि. र. बाम** यांनीं ही नाटिका प्रसिद्ध करण्याची जबाबदारी स्वीकारून तें काम मोठ्या आपुलकीनें पार पाडलें आहे त्याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहें.

अलिबाग,
लोकमान्य टिळक पुण्यतिथि.
दिनांक १-८-४८

**ना. द. मराठे**

# उद्यांचा महाराष्ट्र

[ या नाटिकेचा प्रथम प्रयोग बुधवार ता. २२-१२-४३ रोजीं रात्रौ 'इंडस्ट्रिअल् हायस्कूल, अलिबाग' मधील विद्यार्थिनींनीं स्नेहसंमेलनानिमित्त केला. ]

## प्रथम प्रयोगाचे वेळीं नाटिकेंत कामें केलेल्या विद्यार्थिनींचीं नांवें

**सरला**.........कु. निर्मला किन्नरे
**सुमन**......... ,, लीला सिधये
**उर्मिला** ... ... ,, सिंधू दामले
**उषा**.......... ,, शकुन्तला हेन्द्रे
**लता**.... ... ... ,, इन्दुमति कार्येकर
**शान्ताबाई** ... ,, इन्दु आठवले
**कुसूम** .........,, सुभद्रा कारुळकर
**गंगू** ... ... ... ,, गंगू गलांडे

★

# उद्यांचा महाराष्ट्र

[पुरुषपात्रविरहित एकांकी संगीत नाटिका]

१

## प्रवेश पहिला

[ स्थळ :— सरलाबाईचें घर. त्यांची धाकटी बहीण सुमन पेटी वाजवून एक ईशस्तवनपर व स्वागतपर पद्य बसवीत आहे. सुमनचें पहिलें पद संपत येतांच सरला प्रवेश करिते. ]

पद १ लें ( ईशस्तवन )

[ चाल :— जनमानस मंदिरांत ]

**वन्दन प्रभु पद्युगांस । संकट भय हारकांस ॥**
**तव कृपासुधा भगवन् । देई सकलां जनांस ॥ ध्रु० ॥**
**सकल विश्वपालक तूं । तारक तूं, मारक तूं.**
**मायभूमि सेवण्यास । शक्ति दे प्रभो, अम्हांस ॥ १ ॥**

**सरला** :— ( पद संपल्यावर ) सुमन, आज फार वेळसं तुझं गायन वादन चाललं आहे.

**सुमन** :— अग ताई, मी किनई आपल्या भगिनी मंडळाच्या उत्सवाकरितां स्वागतपर पद्य बसवीत आहे,

**सरला** :— हो कां ! फार छान ! तर मग मला सगळं ऐकूं दे पाहूं पहिल्यापासून.

**सुमन** :— दाखवते हं म्हणून. ( स्वागतपद्य म्हणून दाखविते )

## स्वागतपद्य.

[ चाल :— योग्य न प्रेमवर्णना... ]

स्वागत करित सज्जनां ।
येथें येउनि सारे दाविलात थोरपणा ॥ धृ ॥
वेळ अमोलिक दिधला ।
कौतुक करण्या जमला ॥
केलें बहु उपकारां.
मोद होय फार मनाला ॥ १ ॥

**सरला** :— वाः ! फारच छान. ठीक ! पद तर फारच सुंदर बसलं आहे. पण समारंभाच्या वेळीं नीट धीटपणानें म्हणशील ना ? कां लटपटायला होईल ?

**सुमन** :— त्याची नको तुला काळजी ! आमच्या शाळेंतील डिबेटिंग सोसायटींत होणाऱ्या बहुतेक सभांतून बोलण्याची चांगली संवय केली आहे मी. परवां तर मुलांमुलींच्या मिश्र सभेमध्यें मी भाग घेतला होता.

**सरला** :— विषय तरी काय होता ?

**सुमन** :— श्रीमंतीचे फायदे – तोटे.

**सरला** :— मग विशेष काय झालं ?

**सुमन** :— मी असे वाभाडे काढले आहेत श्रीमंतांचे कीं कांहीं विचारूं नकोस. माझ्या भाषणाच्या वेळीं सारखा टाळ्यांचा गजर होत होता !

**सरला** :— दुसरी बाजू कोणी मांडली ?

**सुमन** :— अग, आमच्या वर्गांत ती लता आहे ना, तिनं.

**सरला** :— असं का ? ती उर्मिलाबाई उंचवट्यांची मुलगी. हं. बरोबर, ती पडली एका लक्षाधिशाची — पेढीवाल्यांची मुलगी. तिला श्रीमंतीची बाजू मांडलीच पाहिजे.

**सुमन** :— ताई, तिची फाजिती काय झाली सांगूं का ?

**सरला** :— काय बरं ?

**सुमन** :— तिनं आपल्या शिकवणीच्या मास्तरांकडून सगळं भाषण आणलं होतन् लिहून. तें नव्हतं धड पाठ. मारे ऐटींत राहिली बोलायला.

चार वाक्यं होतात न होतात तोंच झाली पुंजी खलास नि काय? मग लागली त् त् त्–य् य् य् करायला. शेवटीं कांहीं आठवेना. मुलांनीं मारे टाळ्यांचा कडकडाट चालवला. शेवटीं अगदीं नर्व्हस् झाली नि गेली निघून जाग्यावर.

**सरला** :— मग काय झालं ?

**सुमन** :— तिची थोरली बहीण आहे ना उषा म्हणून पुण्यास कॉलेजांत, ती सुटी झाल्यामुळं आली आहे. घरीं सध्यां ती आली होती आमच्या शाळेची पास्ट स्टुडंट म्हणून. ती राहिली मग आपल्या बहिणीची बाजू सांवरण्यास उभी.

**सरला** :— मग तिनं काय सांगितलं व्याख्यानांत ?

**सुमन** :— ती जरा बोलणारी फटकळ आणि वावदूकच दिसते. बोलून चालून कॉलेज–कन्यकाच ती! श्रीमंतीचं ठराविक समर्थन केलन्. जशी कांहीं पढवून ठेवलेली मैनाच! तिनं श्रीमंतांच्या औदार्याची व गरिबांच्या कैवाराचीं जीं उदाहरणें म्हणून सांगितलीन् तीं सर्व आपल्या घरचींच! आई-बापांची बरीच जाहिरात केली तिनं!

**सरला** :— मग समारोप कसा काय झाला ?

**सुमन** :— अग, आमच्या वर्गाच्या बाईच होत्या अध्यक्ष!

**सरला** :— हो कां ? त्यांना तर श्रीमंतांच्या चढेलपणाचा भारीच तिटकार आहे. तुमच्या मंडळांत त्यांनीं एक बौद्धिक क्लास घेतला होता. तेव्हां मी ऐकले आहेत त्यांचे विचार.

**सुमन** :— आमच्या बाईनीं असे कांहीं मारले आहेत शालजोडींतले, कीं कांहीं विचारूं नकोस. श्रीमंतांची लाडिक मुलं, त्यांचे हट्ट, कोत्या समजुती, पोषाखीपणा, नवीन फॅशन्स्–मारे सर्वांवर कोरडे ओढले! आणि 'उद्यांच्या महाराष्ट्रा'च्या इतिहासांत या ऐदी मुलांमुलींना कसं स्थान मिळणार नाहीं तें अगदीं सडेतोडपणं सांगितलं. (कुसूम प्रवेश करिते.)

**सरला** :— काय कुसूम, आज कुणीकडे ? सुमनशीं कांहीं काम आहे वाटतं ?

**कुसुम** :—पाहूं या म्हटलं सुमन तुमच्याशीं कसल्या गप्पा मारीत आहे ती !

**सुमन** :—अग गप्पा कसल्या ? आपल्या परवांच्या डिबेटिंगची ती गंमत–ती सांगत आहे ताईला.

**कुसुम** :—खरंच सरलाताई. भारीच गंमत झाली त्या दिवशीं ! आमच्या वर्गाच्या बाई किनई किति किति चांगल्या आहेत म्हणून सांगूं.

**सरला** :—त्या कशा ग ?

**कुसुम** :— त्या आम्हांला किती चांगली माहिती सांगतात, किती उपदेश करतात. आम्हीं भगिनीमंडळ काढलं आहे ना तें त्यांच्याच शिकवणीमुळं.

**सुमन** :—आणि त्यांनीं मला व कुसूमला केलं आहे त्या मंडळाचं चिटणीस.

**कुसुम** :—त्या तुमचा आदर्श आमच्या नजरेसमोर ठेवायला नेहमीं सांगतात. त्या म्हणतात कीं, सरलाबाई म्हणजे मूर्तिमंत त्याग, कष्ट व सेवा यांचें प्रतीक आहे. सरलाबाईसारख्या स्त्रियांच्या चरित्रांतूनच 'उद्यांचा स्वतंत्र महाराष्ट्र' निर्माण होईल.

**सरला** :—अग, तुमच्या बाई म्हणजे माझी अगदीं लहानपणापासूनची मैत्रीण. आम्ही दोघी एके ठिकाणीं खेळलों, शिकलों व सार्वजनिक कामांचे धडे घेतले. मग आम्ही आपापल्या आवडीप्रमाणं व परिस्थितिप्रमाणं आमचं कार्यक्षेत्र निवडलं व त्यांत यथाशक्ति काम करीत आहोंत. आमचं दोघींचं कार्यक्षेत्र भिन्न असलं तरी ध्येय एकच आहे.

**कुसुम** :—तें कोणतं ?

**सरला** :— 'उद्यांच्या महाराष्ट्रा' करितां तुमच्यासारख्या सेविका तयार करणं.

**सुमन**—ताई, आतां आम्ही जाऊं का ? आज सुट्टी आहे. तेव्हां म्हटलं सरस्वती उत्सवाची तयारी जरा जोरांत करावी.

**सरला** :—जा बरं, खूप चांगली तयारी करा. समारंभ परिणामकारक व यशस्वी झाला पाहिजे. ( मुली जातात. त्यांच्याकडे पहात ) :किती मोह

आहेत या मुली ! अशा सरळ मनाच्या मुली पाहिल्या कीं, माझी आशालता जरा टवटवीत होते. आजन्म अविवाहित राहून समाज-सेवेकरितां हा देह अर्पण करण्याचं वचन माझ्या आईला देऊन आज दहा वर्षे झालीं ! तें वचन मिळतांच आईला किती आनंद झाला. आई म्हणजे कष्टमूर्ति होती. विरुद्ध परिस्थितीशीं झगडून अनेक हाल अपेष्टा सोसून गेली बिचारी ! आई, तूं स्वर्गात कोठेंही ऐस तुझा त्याग व सेवाव्रत मी कधींही विसरणार नाहीं. तुला दिलेलं वचन मी अगदीं कसोशीनं पाळीन. तुझ्या इच्छेप्रमाणं मी वैद्यकीचा कोर्स पुरा केला. आपली सर्व चीजवस्तू विकून अनाथ, गरीब स्त्रिया व मुलं यांकरितां एक रुग्णालय काढलं आहे. तुझं स्मरण करून प्रत्येक पाऊल पुढें टाकीत आहे. तुझें त्यावेळचे ते अश्रू मला मार्ग दाखवीत आहेत. रुग्णालयाचा वाढता व्याप चालविण्यास श्रीमंतांच्या दातृत्वाचा ओघ वळविला पाहिजे. तोही प्रयत्न चालूं आहे. उर्मिलाबाई उंचवट्यांचं मन रुग्णालयाकडे वळवलं पाहिजे म्हणजे मोठंच कार्य होईल. (गंगू प्रवेश करिते.)

**गंगू :—** सरलाबाई, तुम्हांला वेळ असला तर आमच्या बाईसाहेबांनीं उभ्या उभ्या बोलावलं आहे.

**सरला :—** का ग, काय काम आहे ?

**गंगू :—** तें कांहीं मला नीटसं ठाऊक नाहीं. पण तें तुमच्या दवाखान्याच्या कमिटीबद्दल त्यांना कांहीं विचारायचं आहेसं वाटतं.

**सरला :—** शुभस्य शीघ्रम् ! चल आतांच. असल्या कामाला दिरंगाई नको.

**गंगू :—** चला तर मग. ( जातात व पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा

( **स्थळ :—** उर्मिलाबाईचा अपटुडेट् सजविलेला दिवाणखाना. सकाळची वेळ. गंगू मोलकरीण फर्निचर साफसूफ करीत असते व तोंडानें एकादें पद गुणगुणत असते. मग गंगू आंत जाते. उषा, लता व कुसुम बॅडमिंग्टन् खेळून प्रवेश करतात. हातांत रॅकेट्स् आहेत. पोषाख व वेषभूषा अद्यावत् केलेली आहे. )

**उषा** :—आज बॅडमिंग्टन खेळतांना किती ऊन लागलं ग ?

**लता**—मी तर अगदीं घामानं चिंब होऊन गेलें आहे. हुश्श्‌ ( पदरानें वारा घेतें. )

**कुसूम** :—बाकी उषाताई, आज आपला खेळ चांगलाच रंगला होता, नाहीं ! तुम्ही तर आपल्या नंदिग्रामकरांना क्रीडानैपुण्य चांगलंच दाखविलतं !

**लता** :—आमच्या ताईला पुण्याच्या कॉलेजांतील प्रॅक्टिस चांगलीच आहे. त्यामुळें ती इथल्या सर्व बायकांना टीलविते. इथल्या बायका काय संध्याकाळीं घटकाभर एक फॅशन म्हणून व करमणूक म्हणून खेळतात. त्यांचा खेळ आपला तितपतच !

**उषा** :—खरं सांगूं का तुला, आमच्या कॉलेजांत आम्ही मुली मुलांबरोबर खेळतों म्हणूनच आमची प्रॅक्टिस वाढली आहे. पुरुषांबरोबर खेळल्याशिवाय डावाला रंग येत नाहीं. नुसत्या बायकांच्यांत खेळणं म्हणजे बायकीच तें ! मुलांबरोबर खेळण्यांत एक प्रकारचा स्टंट आहे. तें चुरशीचं खेळणं, ती ‘ बघ्या ’ लोकांची गर्दी, त्यांतील कांहींचा लघळपणा, तें स्त्रीदाक्षिण्य आणि मागून श्रमपरिहाराकरितां पेयपान ! अशी कांहीं गंमत असते कीं ती पहाण्याकरितां तुम्हांला तिकडेच आलें पाहिजे.

**कुसूम**—पण आपल्या नंदिग्रामसारख्या लहानशा गांवात स्त्रियांचे एक दोन क्लब्स्‌ आहेत हेंच विशेष ! तुम्ही येथील शाळेंत असतांना एक तरी क्लब होता का ?

**उषा** :—छे ! एक सुद्धां नव्हता. नाहीं म्हणायला कांहीं बायका संध्याकाळीं फिरायला मात्र जात असत. पण आतां आपल्या गांवांत बरीच सुधारणा झालेली दिसते. नुसत्या बायकांचे कां होत ना, पण एक दोन तरी क्लब्स्‌ आहेत म्हणायचे.

**लता** :—तरी आतां इथं सुद्धां पुरुषांबरोबर खेळण्याची चाल लवकरच पडूं लागेल. आम्ही नाहीं कां आमच्या शाळेंत मास्तरांबरोबर खेळत. आतां आस्ते आस्ते मुलांबरोबर खेळण्याची सुद्धां चाल आम्ही पाडणार आहोंत.

**कुसूम** :— हां, हां ! तसं झालं म्हणजे जो तो विद्यार्थी उठेल आणि बॅडमिंग्टन खेळायला लागेल ! बाकी सारे खेळ ओस पडायचे ! आमच्या लतेला काय मुलांशीं गप्पा गोष्टी करण्याची संधी अनायसेंच मिळेल.

**लता** :— ( कुसूमच्या खांद्यावर एक चापट मारून. ) चल वात्रट कुठली. जशी कांहीं तुला ही संधि नकोच असेल !

**कुसूम** :— बरं. आतां फार उशीर झाला. जातें मी आतां. सुमन माझ्याकडं येणार आहे.

**उषा** :— कशाला ग ?

**कुसूम** :— अग, आतां आमचा उत्सव परवांवर आला ना ? आम्हांला कार्यक्रम पत्रिका तयार करायची आहे.

**लता** :— सुमनला आतां दुसरा उद्योग सुचताय कशाला. नुसती नादिष्ट आहे. एकदां एकाद्या गोष्टीच्या नांदी लागली कीं सर्व कांहीं तेंच. सरला-बाईची बहीणच ती ! दोघी बहिणी अगदीं सारख्या आहेत.

**उषा** :— ( कुसूम जात असतां तिचा हात ओढून ) बैस ग ! जाशील. आतां आपण एवढ्या दमून आल्यावर श्रमपरिहारार्थ कांहींच का नको ? थोडा गरमगरम चहा पिऊं नि मग जा. मी सांगतेंच चहा आणायला. गंगू, ए गंगू— ( गंगू प्रवेश करते ) काय ग, आई कुठं आहे ?

**गंगू** :— तुम्ही बाहेर पडल्यावर त्या बाहेर गेल्या.

**लता** :— कुठं गेल्या ?

**गंगू** :— कुठं बरं ..... त्या कलेक्टरसाहेबांकडं गेल्या असतील. उद्यां कलेक्टरला व त्यांच्या बायकोला चहाला बोलवायचें आहे वाटतं.

**उषा** :— असं का ? बरं हें पहा, आपला स्वैपाकी कृष्णय्या खालीं असेलच त्याला म्हणावं, तीनचार कप चहा कर. त्याला सांग चहा अगदीं उत्तम – स्ट्रांग, अगदीं ' ए वन् ' झाला पाहिजे हं !

**गंगू** :— बरं घेऊन येते हं.

**कुसूम** :— कलेक्टरसाहेबांना चहापार्टी कशाबद्दल ?

**उषा** :— अग, आमच्या आप्पांना किनई नुकतीच रावबहादुर ही पदवी

मिळाली आहे सरकारांतून त्याबद्दल जो उठला तो त्यांच्याजवळ मेजवानी मागतो. हल्लीं काय आमच्या घरीं चहापार्टीचं अगदीं पेव फुटलं आहे. उद्यां बहुतेक सरकारी अधिकाऱ्यांना पार्टी असेल.

**लता** — परवांच नाहीं का आमच्या आईनं आपल्या क्लबांतील सर्व स्त्रियांना श्रीखंडपुरीची फीस्ट दिली.

**कुसूम** :— बरोबर आहे. रावबहादुर ही पदवी फुकटची आली आहे वाटतं ? त्यांकरितां एवढा खर्च केलाच पाहिजे. आणि तुमच्यासारख्या श्रीमंतांना काय तोटा ? उद्यां तुझे आप्पा मुंबईस जाऊन मोत्यांचा एखदा सट्टा करतील तर त्यांत हजारपांचशें रुपये सहज मिळवतील. बोलूनचालून पेढीवाले तुम्ही ! ( सुमन प्रवेश करिते. )

**सुमन** :— कुसूम, तुझ्या घरीं किती वेळ ग येऊन बसायचं ? तुला कांहीं अपॉइंटमेंटची आठवण आहे का ?

**कुसूम** :— अग मीं यायला निघालें होतें. पण या उषाताई सोडतील तेव्हां ना ?

**सुमन** :— शेवटीं मी अगदीं कंटाळलें. मला वाटलंच तूं येथें असशील. तुला पण बॅडमिंग्टनचा नाद लागला आहे ना ! म्हणून शेवटीं इथं आले.

**लता** :— ती येत होती; पण आम्हीच तिला जरा बस म्हटलं. बरं झालं त्यामुळं तूं तरी आमच्याकडं आलीस. बस आतां आपण सर्वजण बोलत बोलत चहा पिऊं.

**सुमन** :— मी बसतें जरा वेळ. पण मला चहा नको. मी चहा पीत नाहीं.

**उषा** :— तुम्ही एवढ्याशा मुली कसले ग नियम करीत बसतां ? म्हणे मला अमुक खायचं नाहीं नि तमुक खायचं नाहीं. जशा कांहीं तुम्ही सती सावित्रीच्या काळांतल्या नाहींतर महात्मा गांधींच्या आश्रमांतल्या.

**लता** — आमच्या उषाताईचं पहाना ! Eat, drink and be merry हा तिचा मॉटो !

**उषा** :— मला पुण्यास त्या 'लकी रेस्टॉरंट' मध्यें चहा पिण्याची संवय झाल्यापासून घरीं केलेला चहा मुळींच आवडत नाहीं. चहा घ्यावा तर इराणी हॉटेलांतलाच !

**कुसूम** :— अहाहा ! तुम्ही हिंदू मुली इराणी हॉटेलांत चहा पितां ! इश्श ! तुम्ही अगदींच ताळतंत्र सोडलाय की ! आमचे बाबा जरी सुधारक मताचे असले तरी त्यांना हें असलं नाहीं खपायचं. ते अगदीं पक्के हिंदुत्व-निष्ठ आहेत.

**उषा** :— आम्ही कॉलेजांत शिकणारीं मुलं हिंदु-मुसलमान असले भेद मानीत नाहीं, आम्ही एकच विश्वबंधुत्व जाणतों. आमच्या राज्यांत जिकडे तिकडे विश्वप्रेम आणि समता ! अग, आतां पुण्यास तर भर सदाशिव पेठे-सारख्या ब्राह्मणी पेठेंत एखादें इराणी हॉटेल उत्तमपैकीं चालेल. त्यांत कॉलेज कुमारिकांची गर्दी आणि त्याच्या भोंवती तो कॉलेजकुमारांचा घोळका मग काय इराणी चहा व तो खुसखुशीत टोस्ट, आम्लेट ! काय विचारूं नकोस !

**सुमन** :— अरेरे, न्यायमूर्ति रानड्यांचं पुणं, विष्णुशास्त्री चिपळुणकरांचं पुणं, समाजसुधारक आगरकरांचं पुणं, समाजसेवक गोखल्यांचं पुणं, लोकमान्य टिळकांचं पुणं म्हणून मोठ्या अभिमानानं आम्ही ज्या शहराकडे पहावं त्या शहराची संस्कृति अशी हीन व्हावी ना ? दुर्दैव, दुसरें काय ! स्वराज्य काळांत वैभव शिखरावर पोंचलेल्या पुण्यास ‘ उद्यांच्या महाराष्ट्रां ’त कोणतें स्थान मिळेल ?

( गंगू चहाचा ट्रे, बिस्किटें वगैरे घेऊन येते )

**उषा** :— आधीं आपण या चहाला पोटांत स्थान देऊं आणि मग ‘ उद्यांच्या महाराष्ट्रांत ’ पुण्याला कोणतें स्थान मिळणार तें पाहूं !

( चहा व बिस्किटें सर्वांना देते. )

**लता** :— गंगू, एक कपभर दूध आण बरं आमच्या या देशसेविकेला. ( गंगू जाते. सर्वजण बिस्किटें खाण्यास सुरवात करतात. इतक्यांत गंगू दुधाचा कप आणते व सुमनच्या हातांत देते. )

**उषा** :— सुमन, दुधाबरोबर बिस्किटं तर घेशील. ( तिच्यापुढें बिस्किटें करते. तीं हातांत घेऊन वरील नांव वाचून सुमन गोंधळल्यासारखी होते. )

**सुमन** :— ‘ हंटले पामर’चीं बिस्किटं ! मी विलायती वस्तू खात नाहीं. पण तुम्ही तरी साठे बंधूंच्यासारखी विलायतच्या तोडीचीं देशी बिस्किटें

मिळत असतांना मग विलायती कां घेतां ? एवढाही तुम्हांला देशाभिमान असू नये ना ?

**कुसूम** :— खरंच – उषाताई, हल्लीं देशी वस्तू एवढ्या चांगल्या चांगल्या मिळत असतांना तुम्ही विलायती माल कां म्हणून वापरतां हो ? तुमचा हा शृंगारलेला दिवाणखाना व तुमची ही वेषभूषा पाहिली कीं असं वाटतं, इंग्लंडमधला एखादा अजबखाना आणून हिंदुस्थानांत तुमच्या घरीं मांडला आहे. तुम्ही श्रीमंतांच्या मुली म्हणजे विलायती मालाची चालतीबोलतीं प्रदर्शनंच.

**लता** :— आम्ही मुद्दाम विलायती माल घेतों असं नाहीं. आमचा कारकून सर्व बाजार करणार. तो आणील तें आम्ही वापरणार. एवढं मात्र खरं कीं, आम्ही त्याला देशीच आण असं बजावीत नाहीं. आमचं त्याला एक सांगणं कीं, वस्तू हायक्लास पाहिजे, मग किंमत कांहींही पडो.

**उषा** :— तुम्ही कांहीं म्हटलंत तरी विलायती व्यापाऱ्यांची सचोटी देशी व्यापाऱ्यांना येणार नाहीं, व विलायती मालाचा 'गेटअप्' तर देशी मालाला खात्रीनें येणार नाहीं.

**सुमन** :— स्वदेशीच्या प्रश्नाकडं केवळ भपकेबाजीच्या दृष्टीनं पाहून काय उपयोग ? स्वदेशीव्रत हें देशांतील उद्योगधंद्यांना वाढविण्याकरितां व बेकारी आणि दारिद्र्य नाहींसं करण्याकरितां घ्यावयाचे असतं. आमच्या मंडळाचा असा नियम आहे कीं, प्रत्येक मुलीनें स्वदेशी व्रत पाळलं पाहिजे.

**उषा** :— खरंच मला तुमचं भगिनी मंडळ म्हणजे काय प्रकरण आहे तें पाहायचं आहे. मी येथें आल्यापासून त्याचा गाजावाजा ऐकतें आहे.

**सुमन** :— तर मग उद्यां आमच्या सरस्वती-उत्सवाला तुम्ही या म्हणजे तुम्हांला आयतीच आमच्या मंडळाची माहिती कळेल. उद्यांच्या समारंभाचं बोलावणं तुमच्याकडं येईलच. पण मी आपली तुम्हांला खाजगी रीतीनं बोलावीत आहें.

**लता** :— होय ग, हो ! उद्यां आम्ही येऊंच. तुम्ही काय कार्यक्रम करतां तो मला बघायला सांपडेल. कुसूमची आई आणि तुझी ताई मला किती

दिवस मंडळांत जात जा म्हणून सांगत आहेत. पण आमच्या आईसाहेबांना तें कांहीं आवडत नाहीं.

**उषा** :—उद्यांचा कार्यक्रम तरी काय आहे ? अध्यक्ष कोण आहे ?

**कुसूम** :—मुंबईचे प्रसिद्ध वकील महाशब्दे आहेत अध्यक्ष. कार्यक्रम सांग यांना, सुमन !

**सुमन** :—कार्यक्रम अगदीं साधा आहे. स्वागतपर पद्य. मुलींनीं करावयाची घोषणा, नंतर दोन तीन फिजिकल डेमॉन्स्ट्रेशन्स्, मग अध्यक्षांचें भाषण वगैरे कार्यक्रम आहे. तुम्ही मात्र जरूर या हं ! कुसूम, चला आतां आपण जाऊं. फार उशीर झाला.

**कुसूम** :—चल. ( जातात. )

**सुमन** :—( जातांना ) बरं आहे, नमस्ते ! ( जातात. )

**उषा** :—ठीक, गुड बाय् ! गंगू, अग गंगू, ( गंगू येते ) या कपबशा ने बरं खालीं. काय ग, आईसाहेब आल्या कां बाहेरून ?

**गंगू** :—हो आत्तांच आल्या. मार्केटांतून दोन तीन करंड भरून फळें आणलीं आहेत. काय हो, ताईसाहेब, एवढीं फळं कशाला आणली आहेत बरं ?

**लता** :—अग, उद्यां ऑफिसर लोकांना 'अॅटहोम' आहे ना त्याकरितां असतील.

**गंगू** :—हो का ? मला वाटलं कीं, उद्यां उषाताईना बघायला कोणसं येणार आहे त्यांच्याकरितां आणलीं असतील.

**लता** :—ओहो ! आतां काय बाई ! उद्यां एका माणसाला पाहायला यणार आहेत ! ताई, माणसांना पहायचं म्हणजे काय ग ?

**उषा** :—चल वात्रट कुठची. पाहायचय् बियचय् कांहीं नाहीं. मी एवढी कॉलेजांत शिकत आहे ती लवकर लग्न करण्याकरितां कीं काय ! जा गंगू तूं. आमची आंग धुण्याची वेळ झाली. बाथरुमध्यें पाणी काढून ठेव बघूं. ( गंगू जाते. )

**लता** :—ताई, मग उद्यां जायचं ना आपल्याला समारंभाला ?

**उषा** :— हो. जाऊं ना ! एकदां समजेल तरी ह्या देशसेविकांचं काय थोतांड असतं तें.

**लता** :— पण, आई आपल्याला पाठवील का ?

**उषा** :— त्याची नको तुला काळजी. मी सांगितलं म्हणजे आई ऐकेल. सध्यां आप्पासाहेब माझं लग्न करण्याच्या विचारांत आहेत ना ? तेव्हां त्यांत मी कांहीं फांदा घालूं नये म्हणून, आई मला फार भीत असते. पण या बाबतींत मी आप्पांच्या विचारांना चांगलाच धक्का देणार आहे, हें कुठें ठाऊक आहे त्यांना.

**लता** :— ऐक. जिना वाजतोय . बहुतेक आई वर येत आहे. ( दोघी कोचावरून उठून स्नानाला जाण्याची तयारी करूं लागतात. इतक्यांत उर्मिलाबाई प्रवेश करतात. )

**उर्मिला** :— काय कसली तयारी चालली दोघींची ?

**उषा** :— आतां आम्ही स्नान करायला खालीं जात आहों.

**लता** :— गंगूनं बहुतेक पाणी काढून ठेवलंच असेल.

**उर्मिला** :— लते, तूं जा पुढं. उषा मागून येईल, माझं तिच्याशीं जरा काम आहे.

**लता** :— समजलं काय काम आहे तें. आमच्या ताईसाहेबांना चतुर्भुज करायचं आहे ना, त्यासंबंधींच कांहीं डोस पाजायचे असतील. बरं का ताई-साहेब ! म्हटलं जरा जपून; नाहींतर ठसका लागेल हं. ( धावत जाते. )

**उर्मिला** :— उषे, मी तुला मागें कां थांबवलं तें तुझ्या लक्षांत आलंच असेल.

**उषा** :— सारं आलंय माझ्या लक्षांत ? तूं मला कुक्कुलं बाळ का समजतेस ? आई, मी तुला साफ सांगते कीं, मला इतक्यांत लग्न करायचं नाहीं. माझ्या ध्येयाप्रमाणं अजून मला ग्रॅज्युएट व्हायचं आहे.

**उर्मिला** :— पण असं काय करतेस ? जरा विचार तर करशील. एवढं उत्तम स्थळ नजरेस आलं म्हणून त्यांनीं त्याकरितां एवढी खटपट केली. नवलपूरच्या जहागीरदारांचा मुलगा नुकताच आय्. सी. एस्. झालेला. एवढीं श्रीमंत घराणीं आतां आपल्या जातींत उरलीं आहेत तरी कुठं ! हातचं

आलेलं स्थळ घालवायचं म्हणजे काय ? आमच्यावर तुमच्या लग्नाची जबाबदारी आहे तेवढी एकदां पार पडली पाहिजे. मग यांना किती बरं,बरं वाटेल !

**उषा** :— मला बी. अे. पर्यंतचं शिक्षण दिल्यामुळें तुमच्यावरची जबाबदारी संपली. आतां माझं मी पाहून घेईन. आप्पांना सांग कीं उद्यां मला बघायला कोण येणार आहेत त्यांना कांहींतरी सबब सांगून परत घालवा.

**उर्मिला** :— उषे, तुला आमच्या भावनांबद्दल कांहींच कां वाटत नाहीं !

**उषा** :— आई मला जर तुम्ही असा त्रास देणार असाल तर सरलाबाई-सारखी देशसेविका बनून जाईन एखाद्या आश्रमांत, नाहींतर लतेच्या बाईसारखी काढीन एखादी स्त्रीशिक्षणाची संस्था. ( गंगू प्रवेश करिते. )

**गंगू** :— आईसाहेब, खालीं सरलाबाई आणि लताताईच्या मास्तरीणबाई आल्या आहेत.

**उर्मिला** :— आल्या असतील भीक मागायला. एक म्हणणार माझ्या रुग्णालयांत तुमच्या नांवानं दहा कॉट्स् ठेवा, व दुसरी म्हणणार माझ्या शाळेला एखादा हॉल बांधून द्या. खरोखर, आमची श्रीमंती म्हणजे या सार्वजनिक लोकांना जशी कांहीं लुटण्याकरितांच ठेवली आहे. पैसा मिळवायला काय श्रम लागतात व काय युक्त्या लढवाव्या लागतात याची सुद्धां त्यांना कल्पना नाहीं. बरं जा. त्यांना म्हणावं बसा खालीं, मी आलेंच. ( गंगू जाते. )

**उषा** :— आई, देईनास ना त्यांना थोडी देणगी. एवढ्या त्या आल्या आहेत, नाहीं तरी कसं म्हणायचं ! आपल्यासारख्यांना ऐपत आहे म्हणून त्या मागायला येतात.

**उर्मिला** :— अग, द्यायला कांहीं हरकत नाहीं. पण दररोज कुणी ना कुणीतरी देणगी मागायला येणार. द्यायची तरी कोणाला ? सार्वजनिक लोक आले कीं द्या त्यांच्या संस्थांना मदत, नातेवाईक आले कीं, भरा त्यांची तुंबडी, सरकारी ऑफिसर आले कीं द्या हॉस्पिटल् फंड नाहींतर वॉर फंड ! आम्ही तरी पुरे पडणार कुणाकुणाला. इथं काय पैशाची खाण लागली आहे ?

**उषा** :— पण यांच्या संस्था सार्वजनिक व खऱ्या लोकोपयोगी आहेत, म्हणून त्यांना करावी मदत. एरवीं आपण डामडौलाकरितां, चहापार्टीकरितां काय थोडा खर्च करतों !

**उर्मिला** :—त्यांतूनही मदत केली असती, पण यांना त्याची जाणीव कुठें असते !

**उषा** :—ती कशी काय ?

**उर्मिला** :—अग, देणगी मिळेपर्यंत हे लोक शंभर हेलपाटे घालतील, गयावया करतील, श्रीमंत पुरुषांना समारंभाचे अध्यक्ष करून त्यांच्या बायकांच्या हस्तें बक्षिसं देववतील, काय वाटेल तें करतील, पण एकदां का देणगी पदरांत पडली, कीं हे विसरलेच पूर्वीच्या सर्व गोष्टी ! मग कशाला राहाते यांना देणगीदारांची आठवण ! खरोखर आजकाल परोपकार करणं सुद्धां महा कठीण होऊन बसलं आहे !

**उषा** :—बरं बाई, तुला हवं तसं कर. मला काय करायचं आहे त्याच्याशीं ? पण माझ्या बाबतींत मात्र मी मघाशीं सांगितलं तें लक्षांत ठेव हं ! जातें मी आतां आंग धुवायला. ( जाते. )

**उर्मिला** :—चल मी पण आलेंच. त्या खालीं बायका आल्या आहेत त्यांची कांहीं तरी बोळवण केलीच पाहिजे. ( जाते. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ** :—शांताबाई धडफळे यांचें घर. त्यांची मुलगी कुसूम कवि ‘ अज्ञातवासी ’ यांचें महाराष्ट्र–गीत पाठ करीत आहे. ]

**कुसूम** :—( थोडेसें म्हटल्यावर ) काय करावं बाई अजून कांहीं हें गीत चांगलंस पाठ झालं नाहीं. ( पुन्हा वाचीत बसते. एक श्लोक म्हटल्यावर शांताबाई प्रवेश करतात. )

**शांताबाई** :—कुसूम, काय पाठ करतेस ?

**कुसूम** :—कवि ‘ अज्ञातवासी’चें ‘ महाराष्ट्र–गीत. ’

**शांताबाई** :—ते कां ? आतां अगदीं मुद्दामसं चाललं आहे पाठान्तर !

**कुसूम** :—आज संध्याकाळीं आमच्या मंडळाचा उत्सव आहे ना ! त्यावेळीं समारंभाचे शेवटीं हें गीत म्हणून दाखविण्याची कामगिरी आहे माझ्याकडं.

**शांताबाई** :— हो का ? तर मग कामगिरी चांगली वठली पाहिजे बरं का ! म्हणून दाखव पाहूं ? कसं म्हणतेस ते ऐकूं दे तर खरं !

[ कुसूम गीत म्हणून दाखविते. ]

**शांताबाई** :— शाबास ! संध्याकाळीं ह्याच्याहून चांगलं वठलं पाहिजे.

**कुसूम** :— माई, तूं येशील ना आज समारंभाला ?

**शांताबाई** :— हो तर, तूं मंडळाची चिटणीस ना ! मग मला नको का यायला तुझं काम बघायला ?

**कुसूम** :— आम्ही कसलं काम करतों आई. आमच्या बाई आणि सरलाबाई आमच्याकडून सर्व करून घेतात. माई, सरलाबाई किती चांगल्या आहेत नाहीं ? आमच्या मंडळांतील मुलींना त्या अगदीं जीव कीं प्राण वाटतात.

**शांताबाई** :— खरोखर ती मोठी आदर्श बाई आहे. अष्टौप्रहर आपल्या रुग्णालयाकरितां कष्ट करीत असते. रोग्याची अशी शुश्रुषा करते कीं त्यांना वाटेल आपलं दुखणं लवकरच बरंच होऊं नये !

**कुसूम** :— त्यांची रहाणी नि करणंसवरंण किती नियमित व टापटिपीचं असतं !

**शांताबाई** :— खरोखर सरलाबाईसारख्या आजन्म अविवाहित रहाण्याचें व्रत घेऊन समाजसेवा करणाऱ्या सुशिक्षित स्त्रिया आपल्या महाराष्ट्रांत कितीशा असतील ? ‘ उद्यांच्या महाराष्ट्रा ’ चें भवितव्य सरलाबाईसारख्या स्त्रियांच्या हातांत आहे.

**कुसूम** :— पण त्यांना सुद्धां नांव ठेवणाऱ्या बायका गांवांत आहेतच ! त्या रावबहादुरीण उर्मिलाबाई व त्यांची ती कॉलेजकन्यका त्यांची नेहमीं टवाळी करीत असतात !

**शांताबाई** :— अग हें असं चालायचंच. जगांत गुणांची किंमत जाणणारीं माणसं फार थोडीं असतात. उर्मिलाबाईसारख्या श्रीमंत आणि ऐदी बायकांना टवाळी करण्याशिवाय दुसरा उद्योग काय ? त्यांची हांजी हांजी करणारीं माणसं असतील तीं त्यांना प्रीय.

**कुसूम** :— सरलाबाईची तर अशी शिकवण आहे कीं कोणाची खोटी स्तुति करूं नये व स्वाभिमान कधीं सोडूं नये.

**शांताबाई** :—उर्मिलाबाईंना असं झालं आहे कीं मी श्रीमंतीण! तेव्हां माझी छाप सर्वांवर पडावी. लोकांनीं सर्व ठिकाणीं मला आधीं मान द्यावा. पण आतां फुकट मान उपटण्याचे ते दिवस गेले.

**कुसूम** :—त्यांच्या उषा व लता तर इतक्या आढ्यतेखोर आहेत कीं बोलायची सोय नाहीं. सदान् कदा आपल्या थाटामाटांत नि श्रीमंतीच्या प्रदर्शनांत गर्क!

**शांताबाई** :—ती उषा इतकी शिकली सवरलेली मुलगी पण तिच्या मनावर शिक्षणाचा कांहीं परिणाम झालाय् का? जें शिक्षण मनोविकास करीत नाहीं, दुसऱ्याच्या भावना ओळखत नाहीं तें कसलं शिक्षण! अशा नुसत्या पुस्तकी–पढिक बायकांचा समाजाला किंवा देशाला काय उपयोग!

**कुसूम** :—गांवातल्या दुःखी जिवांची तिला आठवण होत नाहीं आणि विश्वबंधुत्वाच्या नि समतेच्या मारे गप्पा मारते!

**शांताबाई** :—अग कृतिशून्य माणसं नुसती बडबडच करायचीं! अंगांत प्राण नाहीं पण तोंडाची तोफ मात्र सदा डागलेली! त्या चटकचांदणीचा नुसता नट्टापट्टा पाहून घ्या! हिंदु संस्कृति म्हणजे काय याची तिला ओळख असेल तर ना! (सरलाबाई प्रवेश करतात.)

**शांताबाई** :—या सरलाबाई, बसा. बऱ्या आलांत, या मुलींचे बेत ऐकलेत का?

**सरलाबाई** :—अहो, या मुली म्हणजे तुम्ही काय समजलांत? 'उद्यांच्या महाराष्ट्रा'चे हे आधारस्तंभ आहेत. असे हे आधारस्तंभ घरोघर कितीतरी आहेत. पण आपला समाज आंधळा आहे ना? अशा मुलींना योग्य शिक्षण देऊन ह्या भावी सुगृहिणी व सुमाता करण्याच्या दृष्टीनं कोण पहातो आहे?

**शांताबाई** :—तुमच्यासारख्या स्त्रिया आहेत ना त्यांना मार्गदर्शक! सरलाबाई, तुम्ही एवढ्या शिकलेल्या पण तुमची रहाणी किती साधी आणि विचारसरणी तरी किती उच्च! तुमची तुमच्या संस्थेकरतां कष्ट करण्याची कमाल आहे बाई!

**सरलाबाई :**— अहो असं संस्थेशीं एकरूप झाल्याशिवाय कां कुठं संस्था चालतात ! आणि अशा संस्थांना श्रीमंतांनीं आर्थिक सहाय्य द्यायला नको का ? पण त्याचीच तर सारी पंचाईत. आम्हांला समाजसेवेची आवड आहे तर आम्ही निर्धन नि उर्मिलाबाईसारख्यांजवळ पैसा आहे तर त्यांना नाहीं असल्या कार्यांची हौस !

**कुसूम :**— बरोबर, जिथं दांत आहेत तिथं चणे नाहींत. आणि चणे आहेत तिथं दांत नाहींत !

**शांताबाई :**— अहो, उर्मिलाबाईंच्या पैशालाही व्यय आहेच की ! त्यांच्या मेजवान्या, कपडालत्ता, दागदागिने, नोकरचाकर, मोटारगाड्या यांना थोडा का पैसा लागतो ?

**सरलाबाई :**— या खर्चाबरोबरच थोडीशी दानधर्माची आठवण नको का व्हायला ? त्यांच्याजवळ तरी एवढा पैसा आला कुठून ? शेंकडों गरिबांचा थोडा थोडा पैसा मिळूनच एक श्रीमंत होतो ना ? मग ज्यांच्या जिवावर आपण श्रीमंत झालों त्याच्याकरितां थोडीबहुत झीज सोसायला नको का !

**कुसूम :**— एवढी जर श्रीमंतांना जाणिव असती तर जगांत बोल्शेव्हि-झम्‌चा एवढा प्रसार झाला असता कशाला !

**शांताबाई :**— खरंच, काल तुम्ही उर्मिलाबाईकडे गेलां होतां त्याचं काय झालं ?

**सरलाबाई :**— हो. तें सांगण्याकरतांच मी आलें आहे. पण कुसूम, माझं एक काम करतेस ?

**कुसूम :**— हो. तुम्ही आम्हांला कांहींतरी काम सांगावं ही तर आमची इच्छा ! पण तुम्ही तर आम्हांला कांहींच काम सांगत नाहीं—ही तर आमची तक्रार ! तुम्ही आपली सारीं कामं स्वतःच करतां.

**सरलाबाई :**— पण आतां काम सांगते ऐक. तुमच्या मंडळाच्या खजि-नदार तुमच्या बाईच आहेत ना ? त्यांना हा एक रुपया नेऊन दे. म्हणावं रुग्णालयांत आलेल्या एका अत्यंत गरीब बाईनं हा रूपया स्वतःच्या पोटाला चिमटा घेऊन मंडळाच्या कार्याला दिला आहे. तो जमा करून तसें आजच्या समारंभाला एका ‘क्ष’ बाईच्या नांवानें तो जाहीर करा.

**कुसूम** :—हात्तिच्या ! हेंच का काम ? हें तर मंडळाचं म्हणजे आमच्या घरचंच काम ! सरलाबाई, तुम्ही आपलं स्वतःचं एखादं काम कां हो नाहीं सांगत ?

**सरला०** :— हो का, बरी आठवण झाली. मी सांगेन तें ऐकशील ना पण ?

**कुसूम** :—तुम्ही सांगून तर बघा ऐकते कीं नाहीं.

**सरला** :—येथील कवी 'बालमाधव' यांचें एक पद तूं म्हणून दाखवायचं मला कबूल केलं होतंस तें म्हण पाहूं आतां.

**कुसूम** :—एवढंच ना ! त्यांत काय मोठंसं. ऐका.

**पद** (चाल – तूं कौनसे बद...)

**कां शिणविसि तूं व्यर्थ मना बालकुमारा ?**
**स्वार्थि जग हें तुजसि कुठें देइं न थारा ॥ ध्रु० ॥**
**दारिद्र्य असें तुज पुढतीं घोर सहारा**
**वाहत असे ऊष्ण सदा वात भरारा**
**स्वार्थि जग हें तुजसि कुठें देइं न थारा ॥ १ ॥**
**या दुष्ट जगीं मिळत नसे सौख्य भिकाऱ्यां**
**वसन मिळे झांकाया ना शरीरा**
**स्वार्थि जग हें तुजसि कुठें देइं न थारा ॥ २ ॥**

**सरला** :—छान म्हटलंस हो, शाबास !

**शांताबाई** :—अहो, पण त्या गरीब बाईला एवढी स्फूर्ति कशामुळं झाली ?

**सरलाबाई** :—अहो, त्याचं असं झालं, परवां सहज मी नि सुमन बसलों होतों त्या बाईच्या शेजारीं बोलत. बोलतां बोलतां ' भगिनी मंडळा'च्या गोष्टी सहज निघाल्या. त्यांत ती बाई इतकी तल्लीन झाली कीं तिनं आमच्या सुमनकडून मंडळाच्या कार्यांची सगळी माहिती सारखे प्रश्न विचारून मिळविली. मग तिला काय स्फूर्ति झाली कोण जाणे, तिनं आपल्या कनवटीचा एकच असलेला हा रुपाया चटकन् काढून दिला आणि म्हणाली कीं, "हा रुपया मंडळाच्या वाटेल त्या कार्याला खर्च करा. माझी ही अगदीं जिवाभावाची सर्व पुंजी मी तुमच्या हवालीं केली आहे.

**शांताबाई** :—पहा. इतक्या गरिबांना सुद्धां समाजऋण म्हणून कांहीं असतं याची जाणीव होते. श्रीमंतांना त्यांचं कांहीं आहे का? खरोखर या बाईचा एक रुपया म्हणजे उर्मिलाबाईसारख्यांच्या लाखरुपयांचे ठिकाणीं आहे. याला म्हणावं खरा त्याग. अशा त्यागमूर्ति आपल्या समाजांत पुष्कळ निघतील, तर 'उद्यांचा महाराष्ट्र' वैभवशाली व सुखसंपन्न होईल यांत काय नवल!

**कुसूम** :—मंडळाच्या कार्यांच्या नुसत्या गोष्टी ऐकून जर मनावर एवढा परिणाम होतो तर प्रत्यक्ष त्याचें काम पाहून किती परिणाम होईल? आजच्या समारंभाला उषा आणि लता मुद्दाम येणार आहेत, तेव्हां त्यांच्या मनावर आमच्या कार्याचा कांहीं परिणाम होईल का? तसं झालं तर किती छान होईल? पुन्हा लता आणि मी एकमेकींच्या सहकारी होऊं.

**सरलाबाई** :—माझी तर मनोदेवता असं सांगत आहे कीं, आजच्या समारंभाचा परिणाम त्यांच्या मनावर खात्रीनें होईल. आजच्या समारंभानं उषेचा हृदयपालट नक्की होईलसं वाटतं.

**शांताबाई** :—असा कोणाचा तरी हृदयपालट झाला तरच असले समारंभ साजरे करण्याचा उपयोग! बरं कुसूम, तूं जातेस ना तो रुपया पोंचतां करायला? (कुसूम धांवत जावयास निघते. पण मधेंच शांताबाई तिला परत हांक मारतात) अग हो, कुसूम, तूं चाललीस खरी पण तुझ्या आवडत्या सरलाबाईना काय तूं नुसतीच परत दवडणार? त्यांचा कांहीं पाहुणचार नको का करायला?

**कुसूम** :—अय्या! खरंच कीं! पण त्या चहा तर पीत नाहींत, मग काय आणूं त्यांच्याकरितां?

**सरलाबाई** :—थंडगारसं पाणी नि एक गुळाचा खडा! बस झालं जास्त कांहीं नको.

**कुसूम** :—वा, असं कसं हो......हो, आजच आमच्या अण्णांनीं बागेंतून चांगली लिंबं आणलीं आहेत. तेव्हां सरबत करून आणतें. तुम्हांला सरबत फार आवडतं तें ठाऊक आहे मला.

**शांताबाई** :—आणि हें पहा, आपल्या बागेंतलं तें सोनकेळ्याचं पिकलेलं लोंगर आहे ना त्यांतली थोडी केळीं घेऊन ये. (कुसूम उड्या

मारीत जाते. ) आमच्या इथं किनई बाग लावण्याचा भारीच नाद आहे हो ! मुद्दाम वसईहून त्यांनीं सोनकेळ्याचं उंची बियाणं आणवलं त्याचीं केळीं आहेत हो ही !

**सरलाबाई** :— खरंच, आण्णासाहेबांना बागायतीचा भारीच नाद दिसतोय ! पण काय हो, त्यांचं एवढं वकिलीचं काम सांभाळून त्यांना वेळ होतो तरी कसा ?

**शांताबाई** :— अहो, कसचा वेळ होतोय्. त्यांतल्या त्यांत वेळ काढतात झालं. सकाळीं बागाईत, दुपारीं कोर्ट नि संध्याकाळीं हिंदुसभा. सदान् कदा हिंदूसभेचें लोक त्यांच्या मागें आहेतच. आज काय म्हणे सावरकर आले आहेत, नि उद्यां काय म्हणे भोपटकर येणार आहेत. अस्सं सारखं चाललं आहे. त्यांना घराकडे व संसाराकडे बघायला वेळ आहे कुठें ?

**सरलाबाई** :— अहो, पण त्यांनीं तिजोरीची किल्ली तर तुमच्या हातांत दिली आहे ना ? तुमच्यासारख्या कर्तबगार गृहिणी घरांत असल्यावर पुरुषांना संसाराकडे बघून करायचय् काय ? कांहीं तरी श्रमविभाग हा केलाच पाहिजे ना ! तुमच्या यजमानांचा आमच्या 'भगिनी मंडळा'साठीं कसा उपयोग करून घेतां येईल तो सांगा.

**शांताबाई** :— तें राहूं द्या हो. त्याचा विचार मागून करतां येईल. अगोदर तुमचा नि उर्मिलाबाईचा खास 'इंटर्व्ह्यू' काय झाला तो तर सांगा ना ?

**सरलाबाई** :— कसला 'इंटर्व्ह्यू' नि काय ! त्यांना बोलायला फुरसद कुठं होती ? त्यांचं आत्मपुराण सारखं चाल्लंच होतं. कलेक्टरीणबाई अस्सं म्हणाली आणि मामलेदारीणबाई तस्सं म्हणाली. या साऱ्या त्यांच्या गोष्टी !

**शांताबाई** :— पण तुमच्या मुख्य मुद्याबद्दल काय झालं ? तुमच्या रुग्णालयाला कांहीं मदत करतायत कीं नाहीं ?

**सरलाबाई** :— एका खेपेंत का असलीं कामं होतात ? एक देणगी मिळविण्याकरितां दहा हेलपाटे घालावे लागतात. बरं एवढं करूनही एखादी देणगी मिळाली तर 'मिया मूठभर नि दाढी हातभर' अशी होते तिची अवस्था.

**शांताबाई** :— हो, बरोबर. देणगी द्यायची एवढीशी पण तिला असायच्या छप्पन अटी ! एवढ्याशा देणगींत आईवडील, भाऊबंद या सर्वांच्या नामावळीची व्हायची जाहिरात ! या अटीतटीच्या सामन्यांतून संस्थाचालक सहीसलामत बाहेर पडण्याची मारामार ! असाच नाहीं का संचालकांचा अनुभव ? पण तुम्हांला कांहीं आशा आहे का त्यांच्याकडून देणगी मिळवण्याबद्दल ?

**सरलाबाई** :— मी आशा कधींच सोडीत नाहीं. केव्हां ना केव्हां तरी आमच्या कार्याचा परिणाम त्यांच्या मनावर झाल्याशिवाय रहाणार नाहीं. तोंपर्यंत आपलं नुसतं 'पालुपद' पुन्हां चालू ठेवायचं ! त्यांनीं आजपर्यंत दिलेल्या सर्व देणग्यांची जंत्री वाचली तर त्यांतील एक तरी देणगी स्वयंस्फूर्तीची असेल कीं नाहीं कोणास ठाऊक ?

**शांताबाई** :— त्या कशा असणार ? अहो, हे श्रीमंत लोक आपल्यासारख्या गरिबांच्या संस्थांना खुषीनें का मदत करतात ? कोणातरी थोरामोठ्याचं दडपण आणल्याशिवाय नाहीं सुटत त्यांच्या हातून पैसा ! जर जाहिरात होणार असेल व देणगीबद्दल सत्कार होणार असेल किंवा सरकारदरबारीं मानमान्यता मिळण्यासारखी असेल तर त्यांची पिशवी सैल सुटलीच समजा !

**सरलाबाई** :— शेवटीं त्या म्हणाल्या कीं मी तुमची संस्था एकदां पाहीन नि मग करीन देणगीचा विचार ! पण मी असं ठरवलंय कीं आपण उद्यां पुन्हा त्यांच्याकडे जाऊं. तुम्ही याल का माझ्याबरोबर ? तुमची नि त्यांची जरा जास्त ओळख आहे. तेव्हां म्हटलं तुमच्या शब्दांनीं कांहीं काम झालं तर पाहूं.

**शांताबाई** :— तुमच्याबरोबर आनंदानं येईन. पण माझ्या शब्दांनीं काम होईलच असं मात्र समजूं नका. त्यांची माझी ओळख म्हणजे काय बॅडमिंटन क्लबांतील ओळख. ती तितपतच असणार ! खेळण्यापुरती व चहा-चिवड्यापुरती ! त्यांत खऱ्या मैत्रीचा जिव्हाळा का सांपडणार आहे तुम्हांला ? पण मी तुम्हांला एक युक्ती सांगतें तसं करा.

**सरलाबाई** :— काय बरं !

**शांताबाई** :—तुमच्या रुग्णालयाच्या एखाद्या समारंभाकरतां उर्मिला-बाईंना करा अध्यक्ष म्हणजे पहा देणगी मिळते कीं नाहीं तें ! मी कुसूमच्या बाईंना देखील सांगणार आहे कीं तुमच्या शाळेंतील संमेलनाकरतां रावबहादुर आप्पासाहेबांना करा अध्यक्ष आणि रावबहादुरीण उर्मिलाबाईंच्या हस्तें करा बक्षीस समारंभ !

**सरलाबाई** :—पसंत आहे मला तुमची युक्ति ! आमच्या रुग्णालयाचा वार्षिक समारंभ जवळच आला आहे. त्याचं अध्यक्षस्थान देऊं उर्मिलाबाईंना म्हणजे झालं ! उद्यां त्यांना आपण तीच विनंति करूं या.

**शांताबाई** :—कांहीं हरकत नाहीं. एकदां अध्यक्षस्थान तर गळ्यांत पडूं द्या त्यांच्या. मग देणगी मिळविण्याचं पहातां येईल.

**सरलबाई** :—पण उद्यां आपण त्यांच्याकडे जाऊं तेव्हां आप्पासाहेब असतील का घरांत ? ते असले म्हणजे बरं. त्यांचीही सहानुभूति मिळवितां येईल आपल्याला.

**शांताबाई** :—तें कांहीं सांगता नाहीं. आताशां आप्पासाहेब वारंवार मुंबईला फार जाऊं लागले आहेत. मग काय एवढं काम असतं कोण जाणे !

**सरलाबाई** :—अहो, पेढीवाले ते. त्यांना काय नेहमीं सोनं चांदी खरेदीकरतां मुंबईस जावंच लागतं. ते उषेचं लग्न जमविण्याच्या खटपटींत आहेत म्हणे ! कोणातरी आय्. सी. एस. चं स्थळ असून तो एका जहागिर-दारांचा मुलगा आहे वाटतं. त्याकरतां कदाचित् ते मुंबईला जात असतील वारंवार.

**शांताबाई** :—लग्नाच्या बाबतींत उषेनं त्यांना चांगलाच धडा शिकवला आहे ! तिनं साफ सांगितलं कीं मला लग्नकर्तव्य नाहीं म्हणून. "माझं लग्न ठरविणारे तुम्ही कोण? मग मला एवढं शिक्षण कशाला दिलंत? माझ्या पतीची निवड मीच करीन" असं उत्तर मिळाल्यावर त्या उभयतांचे चेहरे काय पाहलेवाईक झाले असतील नाहीं ! अशांना अशींच उत्तरं मिळालीं पाहिजेत. मुलींचे फाजील लाड करतां ना ! आतां भोगा त्याचीं फळं. पण मला त्यांच्या मुंबईच्या खेपांबद्दल दुसरीच एक शंका येत आहे.

**सरलाबाई** :—ती कोणती ?

**शांताबाई** :— त्यांना म्हणे हल्लीं सट्टयांचा फार नाद लागला आहे. क्लबांतील लोकांकडून आमच्या घरीं कळली ही बातमी. हे सांगत होते ती सारी हकिगत !

**सरलाबाई** :— अगबाई ! असा कसा लागला नाद तरी !

**शांताबाई** :— त्यांच्या कांहीं स्नेही व्यापाऱ्यांनीं त्यांना सट्टा करण्याचा नाद लावला आहे. बाकी सट्टयांचा नाद भारीच वाईट हो. आपल्या गांवांतील ते भिकमदास पुरुषोत्तम व्यापारी नाहींत का ? म्हणे ते सट्टा करूनच एकदम भिक्षाधीश झाले ?

**सरलाबाई** :— हं. आतां आलं लक्षांत ! वारंवार मुंबईस जाण्यास कारण तेच असावं. पण काह हो, एखादा सट्टा आप्पासाहेबांच्या अंगाशीं नाहीं ना यायचा ? देव करो नि तसं न होवो ! आप्पासाहेबांसारखे धाडसी नि कर्तबगार व्यापारी म्हणजे आपल्या महाराष्ट्राचीं भूषणेंच होत. आधींच आपला महाराष्ट्र उद्योगधंदे, कारखाने, व्यापार यांत मागासलेला. हल्लीं कुठं कांहीं महाराष्ट्रीय कारखानदार व व्यापारी उदयास येऊं लागले आहेत. ' उद्यांच्या औद्योगिक महाराष्ट्राचा ' पाया पक्का करणारे लोक म्हणजेच आजचा महाराष्ट्रीय कारखानदार व व्यापारी वर्ग !

**शांताबाई** :— खरंच आप्पासाहेबांचा हा सट्टयांचा नाद सुटला तर किती छान होईल ! सट्टयांत लाखों रुपये मिळतात व लाखों रुपये जातातही. घटकेंत लक्षाधीश तर घटकेंत भिक्षाधीश ! पण या व्यापाऱ्यांना त्याचं कांहीं वाटत नाहीं. कांहीं व्यापाऱ्यांचा तर दिवाळं पुकारणं हा एक व्यापारच होऊन बसला आहे !

**सरलाबाई** :— आपल्या महाराष्ट्रीय व्यापाऱ्यांना ती ओली दिवाळी फुंकण्याची कला नाहीं साधत ! हे एकदां व्यापारांत बुडाले कीं कायमचेच बुडाले ! त्यांची एकदम पत जाते, व त्या धक्क्यानें कांहीं जणांना जीवदेखील द्यावासा वाटतो. अशा कांहीं आत्महत्या झाल्याचीं उदाहरणें आपण वर्तमानपत्रांत वाचतों ना ? ( कुसूम सरबताचे पेले व केळीं घेऊन येते. शांताबाई पेले वांटून देतात. तिघी सरबत पितात व केळीं खातात )

**शांताबाई** :— कुसूम इतक्यांत सरबत करून आणलंस ना ! शाबास ! सरलाबाई, कसं काय बनलय् कुसूमनं केलेलं सरबत ?

**सरलाबाई** :—अगदीं उत्तम, ए वन् .बनलय्. शांताबाई, तुमची कुसूम मोठी सुग्रण होणार असं दिसतयं. तुमच्या बाई शाळेंत गृहपाठ देतांना पाकशास्त्र शिकवतात वाटतं कुसूम ?

**कुसूम** :—हो तर, आमच्या शाळेंतील शुक्रवार समारंभ, संमेलन, पिक्-निक् पार्टीज्, ट्रिप्स, वगैरे प्रसंगीं आम्ही मुलीच खाण्याचे पदार्थ स्वतः करतों. आम्हांला नाहीं अचारी नि पाणके लागत! आमच्या बाई त्यावेळीं सूप-शास्त्राचं सगळं शिक्षण आम्हांला देतात. त्या म्हणतात आपण स्वावलंबी बनलं पाहिजे. आपल्या गरजा आपण भागविल्या पाहिजेत.

**सरलाबाई** :—याला म्हणावं खरं शिक्षण! नुसती पुस्तकी पोपट नि मैना तयार करून काय उपयोग? आजच्या महाराष्ट्रांत अजून कितीतरी परा-वलंबी स्त्रिया आहेत. पण आमच्या मुलींना असलं खरं शिक्षण मिळत गेल्यास 'उद्यांचा महाराष्ट्र' स्त्रीदास्यविमोचनाच्या दृष्टीनं स्वावलंबी बनेल. पण शांताबाई, तुमच्या या पाकशास्त्र कोविदेला एकादा हौशी पण पक्का खादाड नवरा बघून द्या बरं का ?

**कुसूम** :—हें हो काय सरलाबाई, तुम्ही माझी अशी चेष्टा करतां? अशानं मी नाहीं बोलणार बरं तुमच्याशीं!

**सरलाबाई** :—बरं, बरं, इतकं कांहीं लाजायला नको अगदीं! जसा कांहीं आजच तुझ्यापुढें कोणी नवरा आणून उभा केला आहे!

**शांताबाई** :—कुसूम, तूं आतां तो रुपया पोहोंचता करावयास जा पाहूं.

**कुसूम** :—ही पहा निघालेंच. पण तशीच मी पुढें आमच्या मंडळाच्या कार्यालयांत जाईन अजून आम्हांला संध्याकाळच्या समारंभाची कित्ति तयारी करायची आहे. (जातांना पेले, बशा घेऊन जाते.)

**सरलाबाई** :—बरं शांताबाई, मी आतां घेते आपली रजा. पण ठरल्या-प्रमाणं उद्यां आपण जायचं बरं का उर्मिलाबाईकडे!

**शांताबाई** :—हो, हो, कबूल. पण केव्हा जायचं उद्यां ?

**सरलाबाई** :—संध्याकाळीं मी चार वाजतां येईन तुमच्याकडं. मग येथून आपण बरोबरच जाऊं. काय ठरली ना ॲपॉइंटमेंट! थँक यू.

**शांताबाई** :— डोंट मेन्शन प्लीज ! चला मी तुम्हांला खालीं दारापर्यंत पोंचवायला येते. चला. (दोघीं जातात. पडदा पडतो.)

---

## प्रवेश ४ था

[ स्थळ :— उर्मिलाबाईंचा दिवाणखाना. उषा सचिंत एका टेबलाशीं बसली आहे, हातानें एका पुस्तकाचीं पानें चाळीत आहे. गंगू एका शेल्फवर पुस्तकें सारखीं लावून ठेवीत आहे. ]

**गंगू** :— ताईसाहेब, आज सकाळपासून तुम्ही अशा खिन्न कां दिसतां ? तुम्हांला कांहीं होत का आहे ?

**उषा** :— छे ग ! मला कांहीं होत नाहीं. उगीच तुला आपलं कांहींतरी वाटतंय झालं.

**गंगू** :— असं कसं म्हणतां ताईसाहेब ? आज तुमच्या मनांत कांहींतरी बदल झालेला दिसतोय ! काल संध्याकाळीं तुम्ही त्या समारंभाहून आल्यापासून तुमच्यांत कांहींतरी बदल झाला आहे असं वाटतं.

**उषा** :— कशावरून बदल झालाय सांग पाहूं !

**गंगू** :— कालपासून तुम्ही सारख्या कसल्यातरी विचारांत आहांत त्यामुळं तुम्हांला खाणांपिणंदेखील कांहीं सुचत नाहीं. लताताईंच्या वागणुकींत सुद्धां कांहींतरी फरक झालेला दिसतो. आज तुम्ही चहासुद्धां घेतला नाहींत. तुमची ती आवडती बिस्किटं—आप्पासाहेब मुद्दाम तुमच्याकरतां मुंबईहून आणतात ती—तींसुद्धां आज तुम्हीं खाल्लीं नाहींत.

**उषा** :— गंगू, आजपासून मी चहा सोडला, आणि तीं बिस्किटं विलायती असल्यामुळं मी ती खाल्लीं नाहींत. आजपासून मी स्वदेशीव्रत घेतलं आहे.

**गंगू** :— काय म्हणतां, ताईसाहेब ? खरं का हें ! तर मग तुम्ही कित्ती चांगल्या आहांत हो. मला तुमचे ते विलायती चाळे मुळींच आवडत नसत. पण आम्ही कसं बोलावं बाई ? बोलून चालून आम्ही मोलकरी माणसं ! म्हटलं लहान तोंडीं मोठा घास कशाला घ्या. त्यांतून तुमचा स्वभाव पडला फार तापट ! श्रीमंतीच्या गर्वानं फट्कन कामावरून काढून टाकाल. मग

आम्हीं गरिबांनीं पोट कसं भरावं ? म्हणून बोलायचं मनांत आलं तरी बोलतां येत नव्हतं ! माफ करा हं ताईसाहेब.

**उषा :**— बोल. बोल. गंगू, आतां हवं तेवढं बोल. मी आतां सारं बोलणं ऐकून घ्यायला तयार आहें. ही उषा आतां कालची राहिली नाहीं. आजपासून या उषेचा हृदयपालट झाला आहे. गंगू, मी जरी पैशानं श्रीमंत असलें तरी मनानं भिकारी होतें. पुस्तकी उच्च शिक्षणानं माझा मनोविकास झाला नाहीं. गंगू, तुमच्यासारखीं गरीब माणसंच मनानं श्रीमंत असतात. मनाच्या श्रीमंतीपुढं पैशाची श्रीमंती तुच्छ आहे. गंगू, तुला देखील माझे विलायती चाळे आवडत नव्हते ना ? सांग बरं कांहींही न शिकतां तुझं मन इतकं विचारवंत कसं झालं ?

**गंगू :**— ते विचार बिचार मला कांहीं समजत नाहींत. पण देशाकरितां आणि आपल्या समाजाकरतां काय करावं याचे धडे मात्र आम्हांला मिळत आहेत.

**उषा :**— कोण ग शिकवतं तुम्हांला ?

**गंगू :**— लताताईच्या बाई आणि सरलाबाई आमच्यासारख्या कामकरी बायांकरितां रात्रीचा वर्ग फुकट चालवतात. त्या वर्गात मी कित्तीतरी दिवस जात आहे. त्यांनीं आम्हांला लिहायला वाचायला शिकवलं, त्या चांगलीं चांगलीं पुस्तकं आम्हाला वाचायला देतात. पुराणांतल्या, इतिहासांतल्या किती छान छान गोष्टी सांगतात. देशाकरतां व आपल्या समाजाकरतां आपण काय केलं पाहिजे, कसं केलं पाहिजे सारं कांहीं सांगतात. नुसतं सांगतात एवढंच नव्हे तर आमच्याकडून त्या वेळ मिळेल त्याप्रमाणें सार्वजनिक कामंही करून घेतात. त्याग, कष्ट, स्वावलंबन व स्वदेशी या चार गोष्टींवर त्यांचा विशेष भर आहे.

**उषा :**— अहाहा ! किती उदात्त ही शिकवण ! त्याग, कष्ट, स्वावलंबन व स्वदेशी ही चतुःसूत्री म्हणजे आपल्या भारताच्या अभ्युदयाची सोपान-परंपराच आहे ! आजपर्यंत आम्ही जगांत आंधळेपणानेंच वावरलों. या सोपानपरंपरेच्या पायाशींच आम्ही धडपडत आहोंत. हा जिना चढून जाण्यास, गंगू, तुझ्यासारख्या मोलकरणीचाच आम्हांला हात धरला पाहिजे.

**गंगू** :— हें काय ताईसाहेब भलतंच बोलतां ! आम्ही काय अडाणी माणसं !

**उषा** :— नाहीं गंगू, तुम्ही गरीब माणसं नाहीं आणि अडाणी तर खासच नाहीं. काय चार लठ्ठ लठ्ठ पुस्तकं वाचतां आलीं म्हणजेच सारं ज्ञान प्राप्त होतं ! छे, छे, अगदीं चुकीची कल्पना ! आतां माझे डोळे साफ उघडले आहेत. आजपासून आपण अदलाबदल करूं या. आजपासून मी तुमच्या रात्रीच्या वर्गात येऊन तुम्हांला पुस्तकी विद्या शिकवणार नि तुमच्या आचरणाचं व स्वभावाचं नीट अवलोकन करून मी व्यवहारज्ञानाचे धडे शिकणार ! बस् ठरलं.

**गंगू** :— खरोखर तुम्ही आमच्या रात्रीच्या वर्गाला आलांत तर किती छान होईल. तुम्ही त्या मोठ्या मोठ्या पुस्तकांतील माहिती आम्हांला सांगाल नि मग मजा होईल ! तुम्ही आल्यानें सरलाबाईंना किती आनंद वाटेल म्हणून सांगूं. ( लता प्रवेश करते. )

**लता** :— गंगू, तुझं इथलं काम आटोपलं असलं तर तुला आईनी खालीं बोलावलाय्.

**उषा** :— आत्तांच एवढं काय आईसाहेबांचं काम निघालं आहे ?

**लता** :— आत्तांच आप्पांची मुंबईहून कांहीं पत्रं नि निरोप आला आहे. ते आणखी चार पांच दिवस इकडे येणार नाहींत. कसल्या तरी महत्त्वाच्या नि भानगडीच्या कामांत ते गुंतले आहेत असं वाटतं ! आत्तां त्यांनीं पाठवलेली एक चिठ्ठी गोवर्धनदास मुरारजींच्या पेढीवर पोंचवावयाची आहे. गंगू, जा बघूं लवकर.

**गंगू** :— ही पहा निघालेंच. ( जाते. )

**उषा** :— लते, तूं अजून लहान आहेस खरी पण तुला सांगायला हरकत नाहीं ! आपल्या अप्पांना मुंबईच्या शेअर बाजारांत जाऊन मोठमोठे सट्टे करण्याचा भारी नाद लागला आहे. एखाद वेळेला जर का एखादी चांगलीच ठोकर बसली तर आपला हा श्रीमंतीचा डोलारा कोसळण्याला वेळ कां लागणार आहे ? बाकी कांहीं का होईना ? माझं मन या श्रीमंतीला अगदीं विटलं आहे !

**लता** :—काय असेल तें असो. कालच्या त्या भगिनी मंडळाच्या उत्सवाचा परिणाम माझ्या मनावर फारच झाला आहे. मला देखील वाटतं कीं आपलं आजपर्यंत कांहींतरी चुकत होतं ! आतां इतक्यांत कुसूम नि सुमन येणार आहेत. मी बोलावलं आहे त्यांना मुद्दाम. त्या माझ्या जिवाभावाच्या मैत्रिणीं असून मी मात्र त्यांना दुरावत होतें. आतां मात्र मी त्यांना जवळ करणार ! यापुढं मी अशी वागेन कीं त्यांच्या माझ्या मैत्रीमधें कधींच खंड पडणार नाहीं. आतां त्या आल्या कीं मी त्यांना सांगणार कीं मला आजपासून भगिनीमंडळांत दाखल करून घ्या म्हणून !

**उषा** :— कालच्या समारंभाचे अध्यक्ष मुंबईचे सुप्रसिद्ध वकील महाशब्दे. किती हृदयस्पर्शी झालं त्यांचं व्याख्यान ! 'आधीं केलं नि मग सांगितलं' अशी त्यांची वृत्ति असल्यामुळं कां नाहीं त्यांच्या भाषणाची छाप पडणार ? त्यांच्या प्रत्येक बोलाला कृतीची जोड असल्यामुळं त्यांचा प्रत्येक शब्द हृदयाचा अगदीं ठाव घेत होता. आमच्या कॉलेजांत मी आजपर्यंत पुष्कळ विद्वानांचीं व्याख्यानं ऐकलीं पण शब्दपंडितच ते. नुसता वावदूकपणा पाहून घ्यावा त्यांच्या व्याख्यानांतून. खरा अंतरीचा ओलावा असेल तर शपथ ! खरी तळमळ, कळकळ नि जिव्हाळा कालच्याच व्याख्यनात पहावयास मिळाला.

**लता** :— काल त्या मुलींचे खेळ किती चांगले झाले नाहीं ? त्या मुलींचा खेळाडूपणा, एकीच्या हुकमतीखालीं एवढ्या मुलींचं खेळणं, त्यांच्यांतील शिस्त व त्यांना मिळणारं हस्तव्यवसायाचं शिक्षण पाहिलं कीं असं वाटतं एकदम त्यांच्यांत मिसळून जावं. नाहींतर आम्ही खेळतों तो बॅडमिंग्टन पहा ? खेळण्यापेक्षां आरडाओरडा नि गोंधळच जास्त ! जरा खेळलं कीं झालं घामाघूम ! हुश्शहुश्श करतां करतां पुरेवाट !

**उषा** :— आणि एवढं दमल्यावर मागून श्रमपरिहाराकरितां चहा नि चिवडा लागतोच ! ( कुसूम व सुमन प्रवेश करतात. )

**सुमन** :— काय ग लता ! कशाला ग आम्हांला मुद्दाम बोलावलंस ?

**कुसूम** :— आमच्या कालच्या समारंभावर कांहीं टीकाबिका करावयाची आहे कीं काय ?

**लता** :— अगोदर बसा तर खालीं ! मग पाहूं टीका बिका काय असेल ती.

**सुमन** :— उषाताई, खरं सांगा हं. कालचा समारंभ तुम्हांला कसा काय आवडला ?

**उषा** :— काय सांगूं तुम्हांला ! कालचा समारंभ इतका चांगला, परिणामकारक नि यशस्वी झाला कीं त्याबद्दल तुमचं अभिनंदनच केलं पाहिजे आणि त्याकरितांच तुम्हांला मुद्दाम बोलावलं.

**लता** :— आणि हें अभिनंदन नुसतं शाब्दिक नाहीं बरं का ! त्याच्याबरोबरच कृतीची जोडही आहे.

**कुसूम** :— ती कोणती ?

**उषा** :— आजपासून नवीन दोन हृदयं तुम्ही आपणांकडे आकर्षून घेतलीत.

**सुमन** :— तीं कोणतीं !

**उषा** :— एक लतेचं आणि दुसरं माझं ! आजपासून आम्ही दोघी तुमच्या झालों ! यापुढील माझं आयुष्य मी आपल्या समाजाकरितां नि गरीबांच्या सेवेकरतां खर्च करणार !

**लता** :— आणि मी आज भगिनीमंडळांत दाखल होणार ! यापुढें भगिनीमंडळ हेंच माझं जीवनक्षेत्र होऊन रहाणार.

**उषा** :— आजपर्यंत आम्ही या स्वार्थी व ढोंगी जगांत फार आंधळेपणानं वागलों, पण कालच्या महाशब्दयांच्या भाषणानं आमच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घातलं. आतां आमचे डोळे चांगलेच उघडले ! या डोळस वृत्तीनं पाहूं लागल्यावर सरलाबाईसारख्यांच्या कार्याची खरी किंमत आम्हांला समजूं लागली. आजपासून सरलाबाईच्या रात्रीच्या क्लासांत मी शिक्षकीण होणार. आज आमच्या गंगू मोलकरणीला पुढील धडा मी शिकवणार !

**कुसूम** } ( दोघी एकदम आश्चार्यानें म्हणतात. )अय्या ! काय ऐकतों
**सुमन** } आम्ही हें ! सारं खरंच ना पण !

**लता** :— अगदीं खरं. खरं, त्रिवार खरं.

**सुमन** :— अय्या ! किती मजा होईल आतां ! ही बातमी मी आत्तांच्या आत्ता ताईला जाऊन सांगतें. कित्ति कित्ति आनंद होईल तिला ही बातमी ऐकून ! चल कुसूम तूंही चल माझ्याबरोबर !

**लता** :— मी पण येते तुमच्याबरोबर. सरलाबाईंना होणारा आनंद आपण सर्वच लुटूं या.

**कुसूम** :— अय्या ! आज काय मजा ! "आनंदी आनंद गडे, इकडे तिकडे चोंहिकडे' !

**लता** :— ताई मी जाते हं. पण तिकडून आल्यावर आपण आपली मोटार काढूं बरं का फिरायला ! तूं मला मोटार ड्रायव्हिंग शिकावायचं कबूल केलं होतंस ना ? तर मग त्याला आजपासून सुरवात करूं.

**कुसूम** :— हां, हां, लते तूं मोटार ड्रायव्हिंग शिकलीस तर फारच चांगलं ! आपल्या मंडळाचं काम निघालं कीं जावं तुला घेऊन मोटारींतून.

**सुमन** :— आणि आमच्या रुग्णालयाकरितां लागली एखाद वेळेला गाडी तर आयतीच सोय झाली फुकटची ! पण लते, जरा जपून मोटार ड्रायव्हिंग शीक बरं का ? तूं आहेस जराशी धांदरट मुलगी ! घेशील नाहींतर एखादवेळेला ॲक्सिडंट करून.

**लता** :— त्याची नको तुला काळजी. माझी ताई अगदीं एक्स्पर्ट आहे त्या कलेंत. तिनं तर पुण्यास मोटार ड्रायव्हिंग कॉम्पिटिशनमध्यें एक बक्षीसही मिळवलं आहे मोठंसं ! ताई पण तूं मला अगदीं तुझ्यासारखं शिकवशील ना ? लवकरच सुमनच्या रुग्णालयाला आपली गाडी म्हणजे ॲम्ब्युलन्स कारच वाटली पाहिजे.

**उषा** :— हो. हो. अगदीं जरूर शिकवीन. आतां मी शिकविण्याचं कंकणच बांधलं आहे. आतां तुलाच काय पण, सुमन, कुसूम, अगदीं सगळ्या मुलींना मी शिकवीन.

**कुसूम** :— सुमन, तुझी ताई आणि माझी माई आतां दोघी यायच्या आहेत इकडेच उर्मिलाबाईंना भेटण्याकरतां. मग तुझ्याकडे जाऊन काय उपयोग ?

**सुमन** :— हो का ? तर मग आपण आपल्या बाईकडे जाऊं या.

**लता** :— हां. हां. चला. आपल्या बाईकडेच चला. (तिघी आनंदानें नाचत, धांवत जातात.)

**उषा** :— त्याग, कष्ट स्वावलंबन व स्वदेशी—या चतुःसूत्रीवर मी आपलं भावी जीवन घालवणार ! पण माझा हा हृदयपालट आईला मानवेल कां ? आप्पांना पडेल का हें पसंत ? खाचित त्यांना हें आवडणार नाहीं ! ज्यांनीं डोळे उघडून जगाकडे कधीं व्यापक दृष्टीनं पाहिलं नाहीं, त्यांना हें कसं पसंत पडणार ? आईबापांच्या मर्जीप्रमाणं वागूं का कर्तव्याच्या हांकेला ओ देऊं ? कांहीं सुचत नाहीं. देवा, मला योग्य मार्ग सुचव. ज्ञानाच्या प्रकाशांतून मला कर्तव्याचा मार्ग चोखाळूंदे.

**पद** (चाल :— रुसली ही राधा...)

**चुकली ही बाला ऽऽऽऽ देवा दयाघना. ॥ धृ० ॥**
**जाळी रे, अनुताप मना ।**
**झडकरी लयाला, भगवाना । ने, ने अज्ञपणा ।**
**लावी रे, सन्मार्गा मज दीना ॥ १ ॥**
**अपुलें सगळें तुच्छच गणिलें ।**
**परांस अन्धपणें अनुसरलें ।**
**शरण अतां कोणा ऽऽऽऽ जाऊं तुझ्याविना ॥ २ ॥**

(डोकें टेबलावर ठेवून विचार करीत बसते. उर्मिला प्रवेश करते.)

**उर्मिला** :— काय ग उषा, सकाळपासून तुला होतंय तरी काय ? तूं अशी खिन्न कां झाली आहेस ? गंगू म्हणत होती कीं तूं आज चहाही घेतला नाहींस. तुझीं आवडतीं बिस्किटंही खाल्लीं नाहींस. आज बरं का वाटत नाहीं तुला ?

**उषा** :— माझ्या शरिराला कांहीं होत नाहीं पण मनाला मात्र तीव्र वेदना होत आहेत.

**उर्मिला** :— मनाला दुःख व्हायला काय झालं ? तुझ्यावर का संसाराची जबाबदारी पडली आहे, का तुला पोटापाण्याची काळजी आहे ? ईश्वराच्या

कृपेनं घरांत धनधान्य, दागदागिना, कपडालत्ता, नोकरचाकर, गाडीघोडा सर्व कांहीं भरपूर आहे, मग काळजी कसली ?

**उषा** :— आई, दागदागिना, कपडालत्ता, नोकरचाकर असल्या चंचल श्रीमंतीचा मला अगदीं तिटकारा आला आहे. मला आतां मनाची खरी श्रीमंती हवी आहे. पक्वान्नं खाऊन खाऊन माझं पोट आजपर्यंत पुष्कळ भरलं पण मला आतां राष्ट्रकार्याची व समाजसेवेची खरी भूक लागली आहे. आई, तुझी श्रीमंती ही माझी भूक शमवील का ?

**उर्मिला** :— मी ऐकतें आहे काय हें ? उषे, तुझ्या डोक्यांत असले विचार कोणी भरविले हे ! राष्ट्रसेवा व समाजसेवा हा निरुद्योगी रिकाम-टेकड्यांचा उद्योग आहे. बेकार लोकांना देशभक्ती हा एक धंदाच होऊन बसला आहे. चार सहा महिन्यांच्या तुरुंगवासाच्या भांडवलावर हा धंदा उत्तम चालवतां येतो. तुझ्यासारख्या सरकारदरबारीं वावरणाऱ्या रावबहादुरांच्या मुलीच्या डोक्यांत असल्या वेडगळ कल्पना शिरणं फार घातुक आहे. तुझ्या डोक्यांतील वेड काढून टाक पाहूं.

**उषा** :— आई, तूं याला वेड म्हणतेस ? तर मग हें वेड मला पुरतें लागूं दे ! या वेडानं माझं डोकं अगदीं फिरून जाऊं दे ! देशभक्ती व समाज-सेवेचं हें वेड मला इतरांना लावतां येईल तर किती छान होईल ! हें वेड महाराष्ट्रांतल्या प्रत्येक तरुण–तरुणीला लागलं तर ‘ उद्यांचा महाराष्ट्र ’ या भारताचा पुढारी होईल. नि मगच लोकमान्य टिळकांच्या आत्म्याला चिरशांति मिळेल.

**उर्मिला** :— लतेच्या वृत्तींतसुद्धां कालपासून बदल झालेला दिसत आहे ! हा कशाचा परिणाम ? हें वेड तुमच्या डोक्यांत भरवलं तरी कोणी ?

**उषा** :— कुणी भरवलं ? सांगूं तुला, ऐक. आई, ऐक. मुंबईच्या महाशब्दयांच्या ओजस्वी व्याख्यानानं हें वेड आम्हांला लावलं ! लतेच्या बाई व सरलाबाई यांच्यासारख्या समाजसेविकांच्या कार्यानं आम्हांला वेड लावलं ! कुसूम, सुमन यांच्यासारख्या पोरींनीं आम्हांला वेड लावलं ! फार काय सांगूं आई तुला, आपल्या गंगू मोलकरणीनं आम्हांला हें वेड लावलं !

**उर्मिला** :— अस्सं काय ? आतां आलं माझ्या लक्षांत सारं ! त्या सरला-

बाईच्या जाळ्यांत तुम्हीं अडकलेल्या दिसतां. आतां सरलाबाईंना म्हणावं या तर खऱ्या माझ्या घरीं भीक मागायला. मग सांगते काय आहे तें! पण गंगू मोलकरणीनं तुला कसं वेड लावलं!

**उषा** :— गंगू मोलकरीण म्हणजे तूं कोण समजतेस? तुला वाटतं कीं ती एक अशिक्षित भावनाहीन अडाणी मोलकरीण आहे म्हणून! पण दिसतं तसं नसतं! ती एक झाकलं माणीक आहे. तिलाच भूतदया म्हणजे काय तें जमजतं. तिचं हृदय किती उदार, तिच्या भावना किती जाज्वल्य, याची तुला कल्पना नाहीं होणार! तिला खरं शिक्षण मिळालं आहे. खरं शिक्षण नुसतं लठ्ठ लठ्ठ पुस्तकांच्या ओझ्यांत नसतं. आम्ही शिकून काय शिकलों तर दहावीस जाडी जाडी पुस्तकं वाचलीं. खरं शिक्षण काय तें गंगूसारख्या गरीब मोलकरणीच्या आचरणांत नि स्वभावांत पहावयास मिळतं! हीं गरीब माणसं आपल्यासारख्या गर्विष्ठ धनिकांकडे अपमानास्पद स्थितींत जी कामावर रहातात ती केवळ पोटाची खळगी भरण्याकरितां रहातात.

**उर्मिला** :— अग गंगे, बरीच ग दिसतेस तूं ढालगज? मला नव्हता माहीत हा तुझा साळसूदपणा? माझ्या घरचं अन्न खाऊन माझ्याच मुलींना शिकवतेस भलतं सलतं कांहींतरी. थांब, हें नाकापेक्षां मोती जड उपयोगाचंच नाहीं. उद्यां तिला कामावरून काढून टाकतें. प्रत्येकानं आपल्या पायरीप्रमाणं वागावं. चांगली खेटरं मारून घालवून देते! चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा हवी!

**उषा** :— तें तूं नक्की करशील! गरिबांच्या पोटावर पाय देणं सोपं आहे. श्रीमंतीच्या गर्वानं फुगलेल्या बायका दुसरं काय करणार तें दिसतंच आहे.

**उर्मिला** :— उषे,बस कर वटवट. फाजील कुठली! मी केवढी, तूं केवढी! कुणापुढं काय बोलावं हें समजतच नाहीं अगदीं तुला. कॉलेजांत शिकून हेंच का दिवे लावायचेत? व्यवहारज्ञानाच्या नांवानें शून्य. आज तूं माझ्यासमोर असं बोलतेस, पण उद्यां ते घरीं आले कीं त्यांच्यासमोर असंच फटकळपणानं कांहींतरी बोलशील. पण सांभाळ हो, त्यांचा राग भारी विलक्षण आहे. तुला अजून कल्पना नाहीं त्याची!

**उषा** :— हो, हो, आप्पा झाले तरी काय असं मोठसं करतील? फार तर घरांतून हांकलून देतील इतकंच ना! पण मी आतां कोणत्याही संकटाकरतां

माझं मन तयार केलं आहे, आजपर्यंत आम्ही डबक्यांत डुंबत होतों, पण आतां आम्हांला अफाट सागरांत पोहायचं आहे. समाजसेवेचा अफाट दर्या उचंबळून आम्हांला बोलवीत आहे.

**उर्मिला :—** अशा काव्यमय कल्पनांत उच्च भराऱ्या मारीत बैस नुसती. बाहेरील जगाच्या वातावरणांत शिरल्यावर एकदां का परिस्थितीचे तडाखे बसूं लागले म्हणजे समजेल काय आहे तें !

**उषा :—** काय वाटेल तें होऊं दे. आतां मात्र माझं मन बदलणं शक्य नाहीं. आई, उगीच फार बोलणं कशाला पाहिजे ? तुझ्याशीं वादविवाद करण्याची माझी आतां मनःस्थिति नाहीं. माझं डोकं अगदीं सुन्न झालं आहे. जरा बाहेर मोकळ्या हवेवर मी जातें. म्हणजे जरा बरं वाटेल. ( जाते. )

**उर्मिला :—** ( थोडा वेळ सचिंत बसून ) काय करावं बाई ? परिस्थिति मोठी बिकट येत चालली. तळहातावरील फोडासारख्या जपून वागविलेल्या मुली खुद्द आपल्या आईबापांना चार गोष्टी सांगूं लागल्या ना ! त्यांची अशी वृत्ती बनण्याला काय बरं कारण असावं ? आम्ही त्यांना दिलेलं शिक्षण, कां आमचंच वर्तन ? कोणत्या घटनेचा हा परिणाम असावा बरं ? त्या भगिनी मंडळाच्या उत्सवाला मी उगीच पाठविलं त्यांना असं मला वाटूं लागलं आहे. मला तरी काय माहीत कीं त्या उत्सवाचा एवढा परिणाम होईलसा ! कांहींतरी उपाय करून मुलींच्या डोक्यांतील हें वेड घालविलंच पाहिजे. आतांशे ह्यांची पण जराशी काळजी वाटूं लागली आहे. सारखे मुंबईस खेपा मारीत असतात. शेअर बाजारांत नि सट्टे बाजारांत एवढी कामं तरी कसलीं असतात. सट्टे करण्याचा फार नाद लागलेला दिसतो. भिकमदास मुरारजींची हुंडी न पटल्याची कांहींतरी भानगड आहे. मग त्यांचें व्यापारी डांवपेंच काय चालले असतील देव जाणे. पण मला मात्र हल्लीं त्यांची फार काळजी वाटूं लागली आहे. एखादा मोठा सट्टा यांच्या अंगाशीं तर नाहीं ना यायचा ! ( सरलाबाई व शांताबाई प्रवेश करतात. )

**शांताबाई :—** काय उर्मिलाबाई, काय चाललं आहे ?

**उर्मिलाबाई :—** कोण ? वकिलीणबाई कां ! यावं यावं. आज फार दिवसांनीं स्वारी इकडे वळलीशी ! या बसा.

**शांताबाई** :— म्हटलं थोरामोठ्यांच्या घरीं फारसं न जावं. आम्ही काय रिकामी माणसं ! आपणांसारख्या मोठ्या लोकांना भारी कामं. नेहमीं मोठमोठ्या लोकांच्या गांठीभेटी व्हायच्या, ट्रिप्स निघायच्या, पार्टीज् असायच्या एक ना दोन हजार कामं !

**उर्मिला** :— अगदीं खरं बाई, वेळ कसा तो अगदीं होत नाहीं. हा आला नि तो गेला. सारखं कांहीं ना कांहींतरी चालू आहे. लोकांना वाटतं कीं आमच्याकडे चाकर नोकर आहेत, तर आम्हांला काय काम ? पण तोंडाची टकली चालवून या नोकरांकडून काम करवून घेणं हेंच कितीतरी मोठं काम आहे ! त्याकरतां किती उरस्फोड करावी लागतें याची काय कल्पना लोकांना ? तें असो म्हणा, पण तुम्ही आतां मुद्दामशां आलांत ? कांहीं विशेष काम आहे वाटतं ?

**शांता०** :— नाहीं. तसं विशेष कांहीं नाहीं. या सरलाबाई आल्या आहेत तुमच्याकडं कांहीं कामाकरतां. त्यांच्याबरोबर मी आपली सहज आलें.

**उर्मिलाबाई** :— का हो सरलाबाई, मी तुम्हांला कालच सांगितलं ना कीं तुमच्या रुग्णालयाला सध्यां देणगी देण्यास आम्हांला सवड नाहीं म्हणून. अजून अगोदरच्या कितीतरी मागण्या पुरवावयाच्या आहेत. मग लागेल तुमचा नंबर. आम्ही तरी देणग्या देणार कुणाला वारंवार नि काय म्हणून ?

**सरला** :— आज मी देणगी मागण्याकरतां नाहीं आलें. मला आपणांस दुसरीच एक विनंति करावयाची आहे.

**उर्मिला** :— ती कोणती ?

**सरला** :— येत्या विजयादशमीला आमच्या रुग्णालयाचा वार्षिक उत्सव आहे. त्या समारंभाचें अध्यक्षस्थान आपण स्वीकारावं अशी आमची इच्छा आहे.

**उर्मिला** :— म्हणजे देणगी उपटण्याकरतां अध्यक्षस्थानाची ही लालूच आहे वाटतं ! मला समजतात बरं का या साऱ्या युक्त्या !

**शांताबाई** :— तसं कांहीं नाहीं. तुम्ही देणगी द्या किंवा नका देऊं. तो तुमच्या खुषीचा प्रश्न आहे. आणि आमची खात्री आहे कीं रुग्णालयासारख्या गरिबांच्या स्थानिक संस्थेला आपण मदत केल्याशिवाय रहाणार नाहीं.

**सरला०** :— विनंति करण्याचा हेतु इतकाच कीं ती एक मानाची जागा आहे व त्यामुळं आपल्यासारख्या श्रीमंत व थोर स्त्रीनं ती विभूषित करावी. त्यावरून आपल्यासारख्या स्त्रियांची सहानुभूति संस्थेला आहे हें सिद्ध होतं व आपल्यासारख्यांच्या नांवाचा आम्हांला पुष्कळ फायदा करून घेतां येतो.

**उर्मिला०** :— तुम्ही एवढं म्हणतां तर मी करीन तुमच्या विनंतीचा विचार. हें घरीं आले म्हणजे त्यांचा विचार घेऊन नक्की काय तें कळवीन तुम्हांला एक दोन दिवसांनीं. पण सरलाबाई, मला तुम्हांला आणखी एक दोन गोष्टी विचारावयाच्या आहेत. पण त्याबद्दल रागबीग मात्र येऊं देऊं नको हो.

**सरला०** :— रागबीग कसला त्यांत. खुशाल विचारा कीं.

**उर्मिला०** :— तुम्ही एक अनाथ व गरीब स्त्रियांकरतां रुग्णालय चालवितां तें ठीकच आहे. त्यांत तुम्हांला कोणी नांवं ठेवणार नाहीं. पण तुम्ही जे दुसरे उपद्व्याप करतां ते कशाला ?

**शांता०** :— कोणते उपद्व्याप ?

**उर्मिला** :— अहो त्या भगिनी मंडळाच्या पाटीशीं तुम्ही आहांतच ! मोलकरणीकरतां रात्रीचे वर्ग चालवतां. मजुरांच्या बायकांत मिसळून त्यांच्या-पुढं व्याख्यानं देतां. हे उद्योग कशाला ? लतेच्या बाई या कामांत तुम्हांला साथीदार आहेतच. मी आतां त्या शाळेच्या चालकांना जाऊन विचारणारच आहे कीं शाळामास्तरणीला हे उद्योग कशाला पाहिजेत ! शाळामास्तरणीनं गांवच्या भानगडींत पडूं नये हें उत्तम !

**सरला** :— शिक्षकिणी झाल्या म्हणून त्यांना कांहीं स्वाभिमान नसतो असं का तुम्हाला वाटतं ? शिक्षकवर्गालाही कांहीं स्वतःचीं मतं असतात, सामाजिक कर्तव्यं असतात, नागरिकत्वाचे हक्क असतात, ही गोष्ट कशी विसरून चालेल ?

**शांता** :— राष्ट्राचे भावी आधारस्तंभ निर्माण करण्याची बरीचशी जबाबदारी शिक्षकवर्गावर आहे. अशा अनेक बंधनांनीं त्यांचे हातपाय जखडून टाकल्यावर त्यांना आपलं कर्तव्य कसं पार पाडतां येईल ? शिक्षकवर्गानं

प्रत्यक्ष राष्ट्रकार्यांत भाग घेतल्याशिवाय त्यांचा आदर्श मुलांमुलींपुढें कसा उभा राहील ?

**सरला :**— पण आमच्या या उद्योगानं तुमचं काय नुकसान होतं तें तरी सांगा ?

**उर्मिला :**— अहो, काय सांगूं तुम्हांला ! कालपासून आमच्या घरांत नुसता घोंटाळा माजला आहे !

**शांताबाई :**— अगबाई, तो कोणता ?

**उर्मिला :**— काल त्या समारंभाहून आल्यापासून जशी कांहीं डोकीं फिरलीं आहेत आमच्या दोन्ही मुलींची ! म्हणे आमचा हृदयपालट झाला आहे ! आजपर्यंत आम्ही डबक्यांत डुंबत होतों, पण आतां अफाट सागरांत पोहायचं आहे ! काय त्यांचे विचार नि काय त्यांच्या काव्यमय कल्पना झाल्या आहेत देव जाणे. मला तर बाई नवल वाटतं कीं एखाद्या व्याख्यानाचा एवढा परिणाम होतो तरी कसा मनावर ?

**सरला :**— मग म्हणतायत् तरी काय तुमच्या मुली ?

**उर्मिला :**— अहो, म्हणतायत् काय कपाळ ! एक म्हणते मी आतां कॉलेज शिक्षण सोडून देणार आणि समाजसेवेला लागणार नि दुसरी म्हणते मी भगिनी मंडळांत शिरून देशसेवेच्या कामीं मदत करणार.

**शांता :**— मग त्यांत बिघडलं काय ? तुमच्यासारख्या श्रीमंतांच्या मुली जर समाजसेवेला व राष्ट्रकार्याला लागल्या तर आपल्या देशाचं भाग्य जवळ आलंच म्हणून समजा. तेंच तर व्हायला पाहिजे आहे. तुमच्या मुलींचीं मतं पालटणं म्हणजे सरलाबाईंच्या कार्याचा विजय होय असं मी मानते.

**उर्मिला :**— आमच्यासारख्या सरकारदरबारीं काम करणाऱ्या आणि व्यापाऱ्यांच्या मुलींच्या मनांत असले वेडगळ विचार येणं बरं नाहीं. त्यांत आमची प्रतिष्ठा कमी होते.

**सरला :**— स्वार्थी प्रतिष्ठेच्या आणि खोट्या मानमरातबाच्या कल्पना आतां सोडून दिल्या पाहिजेत आपण. जग किती पुढं चाललं आहे आणि आपण किती मागं आहों याचा विचार नको का करायला ? जगांतील या

जीवनार्थ कलहांत जर आपणास मानानें जगावयाचं असेल तर आपली दृष्टी जरा व्यापक केली पाहिजे.

**उर्मिला** :—पुरी करा बाई तुमची व्याख्यानबाजी ! या तुमच्या व्याख्यान-बाजीनंच तर आमच्या मुली आम्हांला उलट उपदेश करायला लागल्या. गंगू मोलकरीणसुद्धां आम्हांला शिकवूं लागली. थोरामोठ्यांचा आपमान करण्याची चाल नि बेशिस्तपणा तुम्ही समाजांत वाढवीत आहां. आमच्यासारख्यांच्या देणग्यांवर संस्था चालवावयाच्या नि पुन्हा आमच्यावरच उलटायचं ! खासा न्याय !

**शांता** :— हा देवाघरचा निष्ठुर न्याय आहे. पण त्याला इलाज नाहीं.

**उर्मिला** :— पाहातें ना कसा इलाज नाहीं तों. आधीं त्या गंगीला कामा-वरून काढून टाकते. उद्यांपासून आमच्या मुलींना तुमच्या संस्था बंद करते. मी मुळीं आतां लतेला पुण्यास हुजुरबागेंतच देतें पाठवून शिकायला ! आणि उषेचं लग्न करून तिच्या पायांत अडकवते संसाराची बेडी.

**सरला** :— एकदां मन विकास पावल्यावर कोण विचारतो तुमच्या बंध-नांना ? तीं तडातड तोडतां येतील. गंगूच्या पोटावर खुशाल लाथ मारा. ती आपलं पोट स्वाभिमानानं कुठंही भरील. आपल्या मुलींना खुशाल ठेवा कोंडून ! महाराष्ट्राची उदयोन्मुख पिढी हीं सारीं बंधनं पार तोडून टाकील नि मग मात्र तुमचे डोळे चांगले उघडतील ! चला. तुम्हांला चार गोष्टी सांगून तुमचं मन वळवण्यांत वेळ मोडण्यापेक्षां या मुलींनाच आम्ही चांगल्या तयार करूं. ' उद्यांच्या महाराष्ट्रां'तील या तेजस्वी स्त्रियाच तुमच्या डोळ्यांत चांगलं अंजन घालतील.

**शांता** :— उर्मिलाबाई, श्रीमंतीच्या उन्मादांत तुम्ही हें बोलत आहां. पण लक्षांत ठेवा कीं लक्ष्मी ही चंचल असते. एखाद वेळेला असा प्रसंग येईल, कीं जिला पोटावर लाथ मारून तुम्ही हांकून देणार तीच गंगू तुम्हांला उपकारबद्ध करील ! सरलाबाईसारख्या कार्यतत्पर स्त्रिया आपल्या तपःश्चर्येच्या तेजानं तुम्हाला आपणाकडे खेचून घेतील !

**सरला** :— शेवटीं मला तुम्हांला एवढीच विनंती करावयाची आहे कीं तुम्ही आपलं मन जर शांत ठेवा. उतावीळपणानें एखादं अविचारी कृत्य

करूं नका. दृष्टी जरा अंतर्मुख करून पहा म्हणजे तुमच्या हृदयांत तुम्हांला सत्याचा प्रकाश दिसेल. जातो आम्ही. कमीजास्त बोलण्याचा राग मानूं नका. ईश्वर तुम्हांला सद्‌बुद्धि देवो ! ( जातात. )

**उर्मिला** :—( जरा वेळ सचिंत बसते. ) काय बरं म्हणाल्या ह्या ! यांची ही अमृतवाणी आहे कीं शापवाणी आहे ! कांहीं समजत नाहीं. माझं मन अगदीं गोंधळून गेलं आहे. यांच्या बोलण्यांत भावी संकटाची सूचना तर नाहीं ? मन असं एकाएकी कां बरं दुबळं बनत चाललं ! काय होणार आहे. देवा, तुला ठाऊक. ( टेबलावर डोकें टेकून बसते. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ५ वा.

( **स्थळ** :— सरलाबाईचें रुग्णालय. कार्यालयांत सरलाबाई टेबलावर कांहीं लिहीत बसल्या आहेत. पलिकडच्या अंगाला रुग्णांचा हॉल असून तिकडून मधून मधून रुग्णांचें विवळणें, लहान मुलांचें रडणें ऐकूं येत असतें. )

**सरला** :— काय विधिघटना चमत्कारिक असते पहा ? लता मोटार ड्रायव्हिंगची प्रॅक्टिस करायला बाहेर पडते काय नि तिला ॲक्सिडेंट् होतो काय ? सारंच अकल्पित ! बरं त्यांतल्या त्यांत उषेनं तिला आमच्याच रुग्णालयांत आणलं उपचाराकरतां ! पण उर्मिलाबाईना हें आवडेल कां ! आमचं रुग्णालय म्हणजे गरिबांकरतां ! नाहींतर उर्मिलाबाईना वाटायचं कीं इथं कसची नीट व्यवस्था होणार ! तसं पाह्यलं तर फारसं लागलेलं नाहीं. चारपांच ठिकाणीं खरचटलं आहे नि पायाला जरा मोठी जखम झाली आहे. प्रथमोचार करून बँडेजेस् बांधलीं आहेत. होईल चारसहा दिवसांत बरी. पण योगायोगाच्या गोष्टी पहा कशा असतात त्या. कालच आम्ही ह्यांच्याकडे जाऊन जरा रागवारागवीच करून आलों. आणि आजच त्या मुलीला रुग्णालयांत उपचाराकरतां आणावी लागली ! ( गंगू रुग्णांच्या खोलींतून बाहेर कार्यालयांत येते. )

**गंगू** :— सरलाबाई, लताताईचे आतां ठीक आहे ! आतांच त्यांना कॉफी दिली. आतां पडल्यायत अंमळ जरा स्वस्थ ! उषाताई नि सुमनताई बसल्या आहेत त्यांच्याजवळ.

**सरला**:—बरं तें ठीक झालं पण काय ग, उर्मिलाबाईनीं कालच्या काल तुला कामावरून काढून टाकलं? त्यांना तुझ्याबद्दल दयामाया कांहींच वाटली नाहीं? तुला काढून टाकल्याबद्दल लतेला अपघात घडवून देवानं त्यांना शिक्षा केली कीं काय?

**गंगू**:—तें काय सांगूं बाई मी! त्यांनीं रागाच्या भरांत मला एकदम जा म्हटलं. माझा गुन्हा काय तर म्हणे मी त्यांच्या मुलीना उलट्या शिकवते नि रात्रीच्या वर्गांत शिकावयास जाते!

**सरला**:—मग तूं पुन्हां कामावर ठेवण्याबद्दल कांहींच रदबदली केली नाहींस?

**गंगू**:—छे, मुळींच नाहीं. एकतर त्या रागांत असल्यामुळं माझं बोलणं त्यांनीं नीट ऐकून घेतलं नसतं. आणि मी तरी कांहीं नसतांना कां म्हणून त्यांच्यापुढं गयावया करूं. गरिबांनाही स्वाभिमान असतो हें तुम्हींच आम्हांला शिकवतां ना!

**सरला**:—मग तूं आतां पुढं काय करणार?

**गंगू**:—करायचय् काय? पाहूं चार दिवस वाट! बाईसाहेबांचा राग जरा ओसरला कीं बोलावतील कामावर. आज दहा वर्षं मी त्यांच्याकडं नोकरीला आहे. पण इतके दिवस मी कसे काढले असतील ते माझे मला ठाऊक. बाईसाहेबांची लहर सांभाळतां सांभाळतां पुरेवाट! केवळ आप्पासाहेबांकडे पाहून आम्ही नोकर लोक दिवस काढतो. ते स्वभावानें फारच चांगले आहेत. फारच दिलदार पण भोळा माणूस. ते मुंबईहून आल्यावर मला पुन्हा घेतील रुजूं करून कामावर!

**सरला**:—पण त्यांनीं जर पुन्हां कामावर नाहीं घेतलं तर मला सांग हो. मी करीन खटपट तुझ्याकरतां.

**गंगू**:—बरं मी आतां उर्मिलाबाईकडे जाते. त्यांना बहुतेक अपघाताची बातमी कळून त्या इकडं यायला निघाल्या असतीलच. मघाशीं कृष्णय्या भेटला होता मला वाटेंत. तो म्हणत होता कीं, आईसाहेब कोणत्यातरी संकटांत आहेत. मुंबईहून कसली तरी तार आली आहे. नि तेव्हांपासून त्या

फार चिंतातूर झाल्या आहेत. कोणातरी पेढीवाल्याकडं जायची तयारी करीत होत्या. मग काय भानगड आहे कोण जाणे! मी येते जाऊन तिकडे एकदां.

**सरला०** :— अगबाई! काय बरं असावी भानगड? जा पाहूं काय आहे तें पाहून ये. ( गंगू जाते. ) कोणत्या बरं संकटांत असाव्या उर्मिलाबाई? मुंबईहून तार आली आहे म्हणे! आप्पासाहेबांच्या सट्ट्याची नाहीं ना भानगड! अप्पासाहेबांसारख्या उदार व्यापाऱ्यावर दिवाळें फुंकण्याची आपत्ति न येवो. त्यांच्यासारखे धनिक व्यापारी म्हणजे आमच्या महाराष्ट्राची भूषणें आहेत. आजचा दिवस मोठा चमत्काराचाच दिसत आहे. काय काय बातम्या ऐकूं येतील कोणास ठाऊक?

**कुसूम** :— ( प्रवेश करून ) सरलाबाई, लता कुठं आहे? तिचं कसं आहे आतां? कितपत लागलय. सांगा ना? सांगा ना लवकर? दाखवाना मला लता?

**सरला** :— अग हो! अशी घाबरूं नको. लतेला कांहीं फारसं लागलं नाहीं. कांहीं काळजी नको करूं.

**कुसूम** :— पण ती आहे कुठं?

**सरला** :— ती पलिकडच्या हॉलमध्यें आहे नंबर ५ च्या कॉटवर. उषा नि सुमन पण आहेत तिच्या जवळ. हें पहा, पण तिच्याजवळ बोलूं नको हं फार. त्रास होईल तिला.

**कुसूम** :— नाहीं बोलणार. ( धांवत येतो. )

**सरला** :— काय एकमेकींच्या करतां ओढा असतो पहा. कळल्याबरोबर धांवत आली. भगिनी मंडळांतल्या मुलींत भगिनीभाव कसा चटकन वाढत जातो पहा! ज्या मुली कधीं एकमेकींना भेटायच्या नाहींत, बोलायच्या नाहींत त्या एकमेकीकडे कशा आकर्षिल्या जातात पहा. याला म्हणायचं शुद्ध निर्व्याज प्रेम! ( उर्मिलाबाई घाबरत घाबरत प्रवेश करतात. )

**उर्मिला** :— कुठं आहे माझी लता? सरलाबाई सांगा ना! फार कां हो तिला लागलंय अपघातांत? मी आतां एका पेढीवर जायला निघालें होतें एका महत्त्वाच्या कामाकरतां. पण वाटेंत लतेची बातमी कळल्यामुळं तशीच

गाडी इकडे वळविली. आज कोणाचं तोंड पाह्यलं होतं उठल्यावर कोणास ठाऊक ? आज संकटावर संकटं सारखीं येत आहेत.

**सरला** :— अगदीं बिलकूल काळजी करूं नका. लता अगदीं सुखरूप आहे. आतांच तिचा जरा डोळा लागला असेल. थोडी विश्रांति घेऊं दे तिला. उषा, सुमन आहेत तिच्याजवळ. पण तुमच्यावर एवढीं संकटं तरी काय कोसळलीं आहेत ?

**उर्मिला** :— तें सारं सांगतें मग. मला एकदां लतेला केव्हां पाहीन असं झालं आहे. पलीकडच्या हॉलमध्यें आहे कां ती ?

**सरला** :— हो. नंबर ५ च्या कॉटवर. इकडून जा अशा. मी आलेंच तुमच्या मागोमाग. ( उर्मिला आंत जाते.) एकूण गंगूनं बातमी सांगितली ती खरी आहे म्हणायची ! आप्पासाहेबांचं सट्टाप्रकरण दिसतंय कांहींतरी. काय करावं, जी गोष्ट होऊं नये ती झाली. महाराष्ट्राच्या औद्योगिक उन्नतीला हा एक अपशकून नाहीं का ? यांतही देवाचा चांगला हेतू असेल! कुणीं सांगावं ? कधींकधीं वाइटांतूनही चांगलं निघतं म्हणे !

( शांताबाई प्रवेश करतात. )

**शांताबाई** :— काय सरलाबाई, लतेला मोटार – ॲक्सिडंट झाला आहे म्हणे ! इथंच आहे ना ती ? कसं काय तिचं ?

**सरला** :— काळजी करण्याचं कारण नाहीं. लागलंय्, खरचटलंय् थोडंसं. चारसहा दिवसांत साफ बरी होईल.

**शांताबाई** :— होय ना ! मग ठीक आहे. मला वाटलं किती लागलंय कोण जाणे ! घाबरून गेले मी अगदीं. चला पाहूं दाखवा कोठें आहे ती ?

**सरला** :— थांबा जरा. जाऊं नका तिकडे इतक्यांत. तिला आतां जरा झोंप लागली असेल. उषा, सुमन, उर्मिलाबाई, कुसूम, तिथं आहेतच. उगाच आपली गर्दी नको तिथं आणखी. बसा जरा खालीं.

**शांता** :— बरं बसूं या. काय सरलाबाई, आणखी एक बातमी समजली आहे का तुम्हांला ?

**सरला** :— ती कोणती ? उर्मिलाबाईबद्दल असेल !

**शांता** :—होय. सगळ्या गांवभर झालीय् बातमी. जिकडे तिकडे आज चर्चेला विषय तोच होऊन बसलाय् !

**सरला** :—पण अगोदर काय बातमी ती तर सांगाल ?

**शांता** :—आप्पासाहेबांच्या अंगाशीं तीन लाख रुपयांचा एक सट्टा आला. एवढी रक्कम उभी करतां येईना म्हणून शेवटीं दिवाळं फुंकावं लागलं त्यांना. उभ्या बाजारांतील सगळी पत एका क्षणांत नाहींशी झाली ! त्यांचे एवढे मोठे मोठे व्यापारी स्नेही आहेत ना ! पण एकजण त्यांना आयत्या वेळीं मदत करील तर शपथ ! उर्मिलाबाईचा नूर अगदीं पार पालटून गेलाय् म्हणे.

**सरला** :—फार वाईट बातमी आली आहे ही ! पण या वेळीं आपण उर्मिलाबाईंना धीर दिला पाहिजे. कांहींतरी उपाय करून हें संकट टाळलं पाहिजे. ही अब्रू त्यांची गेली नसून महाराष्ट्रीय उद्योगधंद्याची नि व्यापाराची गेली आहे, असं आपण मानलं पाहिजे. ही अब्रू साफ धुऊन टाकण्याकरतां आटोकाट प्रयत्न करूं या.

**शांता** :—अहो, उभ्या पेठेंत त्यांना कोणी थारा देत नाहीं. मग आपल्यासारखी गरीब माणसं काय करणार ?

**सरला** :—हजारों गरीब जें करूं शकतील तें एका श्रीमंताला करतां येणार नाहीं, हेंच आपण सिद्ध करूं या. महाराष्ट्राची व्यापारी अब्रू राखण्याकरतां आपण गोरगरिबांतून, कामकरी मोलकऱ्यांपासून पै, पैसा करून हजारों रुपये गोळा करूं नि अप्पासाहेबांच्या भोंवताली पडलेला पाश ताडकन् तोडून टाकूं.

**शांता** :—शर्थ आहे बाई तुमच्या धाडसाची ! तुम्ही काय कराल तेवढं थोडं आहे ! आम्हांला काय तुम्हीं सांगाल तें कबूलच. जें आमच्यानें होईल तें आम्ही करूंच.

**सरला** :—आतां उर्मिलाबाई आल्या कीं त्यांना विश्वासांत घेऊन त्यांच्यावरील संकट टाळण्याची योजना आंखूं. माझा आत्मविश्वास मला सांगतोय कीं, या कामांत आपल्याला खात्रीनें यश येईल. पण आतां उर्मिलाबाईंना चांगला धीर दिला पाहिजे बरं कां ! ( उर्मिलाबाई बाहेर येतात. )

**उर्मिला** :—आत्तां ठीक आहे. लतेचं बरं का ? सरलाबाई, तुम्ही फार काळजी घेऊन तावडतोब उपचार केलेत याबद्दल मी फार आभारी आहें तुमची.

**शांता** :—पण हें आहे आपलं गरिबाचं रुग्णालय. तुमच्यासारख्या श्रीमंताच्या मुलीची नीट व्यवस्था—अगदीं तुमच्या मनासारखी होणार नाहीं कदाचित् ! तुम्हांला वाटलं तर एखाद्या मोठ्या हॉस्पिटलमध्यें पाठवा हो तिला. आमची ना नाहीं.

**उर्मिला** :—शांताबाई, उगीच दुःखावर कां डागण्या देतां ? जी गोष्ट सगळ्या गांवभर झाली ती तुम्हांला कळली का नसेल ? आमची श्रीमंती पार लयाला गेली. आमची अब्रू, पत पार सारी नाहींशी झाली. सरलाबाई, आतां आम्ही अगदीं सामान्य माणसं झालों. देवानं आम्हाला धडा शिकवला म्हणायचा ! लक्ष्मी चंचल असते हें आतां आम्हांला समजलं. श्रीमंतीच्या धुंदींत तारवटलेले डोळे आतां साफ निवळले. उषेचा हृदयपालट झाला म्हणून मी तिच्यावर रागावलें. पण आतां माझा हृदयपालट झाला आहे. आतां माझ्यावर कोण रागावणार ! आतां सरलाबाई, मला खरा मार्ग तुम्हीच दाखवा. आतांपर्यंत मी तुमचा पाणउतारा पुष्कळ केला. पण आतां एका नवीन सृष्टींत आलेल्या या बाईला तुम्हींच मार्गदर्शक व्हा—सरलाबाई, आतां काय करूं हो ! ( डोळ्यांना पदर लावते. )

**सरला** :—( जवळ जाऊन त्यांच्या पाठीवर हात ठेवून. ) तुम्ही अगदीं दुःख करूं नका. तुमच्यावरील संकटाची सारी हकिकत समजली आम्हांला. तुम्हीं अगदीं काळजी करूं नका. मी तुमची धाकटी बहीण तुम्हांला आश्वासन देत आहे असं समजा. हें संकट वैयक्तिक नसून महाराष्ट्रीय व्यापारी वर्गावरील आहे असं आम्ही मानतों. यांतून तुम्हांला पार पाडणं हें आमचं कर्तव्यच आहे.

**शांता०** :—उर्मिलाबाई, अगदीं वाईट वाटून घेऊं नका तुम्ही ! सरलाबाईच्या सांगण्याप्रमाणं आम्ही सर्वजण खटपट करून तुम्हांला संकटमुक्त करूं. गरिबांच्या भावना कशा असतात त्याचा प्रत्यय आतां येईल तुम्हांला. ( गंगू प्रवेश करते. )

**गंगू :**— ( उर्मिलाबाईजवळ जाऊन ) बाईसाहेब, तुमच्यावरील संकट सारं कळलं मला. आज दहा वर्षं तुमच्या अन्नावर मी जगले. आप्पासाहेबांनीं आम्हांला किती दयाळूपणानं वागवलं ! त्या अन्नदात्याचे उपकार नको का स्मरायला ? आज दहा वर्षांच्या पगारांतून पै, पैसा करून मी हे शंभर रुपये ठेवले होते सांठवून. अगदीं माझ्या जिवाभावाची पुंजी आहे ही. करतां का हिचा स्वीकार ? आपण दिलेल्या पगारांतूनच केलेली ही बचत आहे. आपण ह्या फुलपाकळीचा स्वीकार केल्यास फार आनंद होईल मला !

**उर्मिला :**— गंगू, गंगू, किती ग तुझं उदार हृदय ! आजपर्यंत तुझ्या विशाल हृदयाची कल्पना नव्हती मला ! शेवटीं तूं मलादेखील उपकारबद्ध करूं पाहातोस ! अत्यंत काबाडकष्ट करून सांठविलेली ही जिंदगी घेण्यास मला फार संकोच वाटतो. आजपासून सरलाबाई मला गुरुस्थानीं आहेत. कर त्यांच्या हवालीं ती पुरचुंडी. त्या त्याचें वाटेल ते करोत !

**शांता० :**— अहाहा ! गंगू तूं आम्हां सर्वांनाच सूचक असा एक मार्ग दाखविलास. तुझ्या देणगीची किंमत रुपये, आणे, पैंत. करून काय उपयोग ? अमूल्य आहे तुझी देणगी ! तूं आपलं सर्व हृदय या देणगींत प्रतिबिंबित केलं आहेस. आम्हांला असं कांहींतरी करण्याचा तूं एक मार्ग दाखविलास. उर्मिलाबाई, तुमचं मन जरा शांत झाल्यावर आपण सर्वजण सावकाश विचार करून एखादी योजना आखूं. तुम्ही आम्हांला विश्वासांत घ्या, नि सारी हकिकत सविस्तर सांगा. आधीं ताबडतोब तार करून आप्पासाहेबांना इकडे बोलावून घ्या. त्यांचं मन आहे फार हळवं ! ते काय करतील याचा नेम नाहीं. आमची खात्री आहे कीं, तुमच्यावरील हें संकट पार निघून जाईल.

**सरला :**— आणि आप्पासाहेबांसारख्या पश्चात्तापदग्ध व्यापाऱ्याकडूनच 'उद्यांच्या महाराष्ट्रा'चा औद्योगिक इमला आम्ही पुन्हा रचूं.

(उषा, सुमन, कुसूम बाहेर येतात.)

**उर्मिलाबाई :**— या मुलींनो, अशा पुढें या. आजपासून या उर्मिलेकडे नवीन दृष्टीनं पहा. माझ्या संसार – नटिकेचा पहिला अंक येथेंच समाप्त झाला. जुन कथानक संपलं. त्यावर आपण पडदा पाडूं या. उद्यांपासून नवीन कथानकास नि नवीन अंकास सुरवात. उद्यांच्या नटिकेतील आपल्या सूत्रधार

सरलाबाई आहेत. आपणाला योग्य मार्गदर्शन करण्याची विनंती त्यांनाच आपण करूं या.

**सरला**:— मी एक सामान्य स्त्री तुम्हांला काय मार्गदर्शन करणार? तो सर्व शक्तिमान् ईश्वरच आपणांला योग्य मार्ग सुचवील. देवा, 'उद्यांचा वैभवशाली महाराष्ट्र' निर्माण करण्याचा मार्ग आम्हांला दाखव. चला आपण सर्वजण भक्तिभावानं त्या प्रभूलाच आळवूं या. म्हणजे तो आपल्या दिव्य प्रकाशानं 'उद्यांच्या महाराष्ट्रा'चें दर्शन आपणाला घडवून आणील.

( सर्वजण पुढील भारतवाक्य म्हणतात. पडदा पडतो. )

**भरत वाक्य – भैरवी**

[ चाल – निशिदिनीं मनीं धरिला..... ]

**निशिदिनीं मनीं स्मरुनी प्रभूला**
**विनति करिती या सकलही बाला**
**सेवुं चला या भारतभूला** ॥ धृ० ॥
**दारिद्र्ये, दास्यत्वें छळिली ।**
**मायभूमि ही आपुली शिणली ।**
**उद्धरूं या, या झडकरी तिजला** ॥ १ ॥

## स मा प्त

मुद्रक : **कृष्णाजी नारायण सापळे**, रामकृष्ण प्रिंटिंग प्रेस, त्रिभुवन रोड, मुंबई ४.

प्रकाशक : **वि. र. बाम**, रामकृष्ण बुक डेपो गिरगांव, मुंबई ४.